# ढोल

आदिवासी बोलीभाषेचे नियतकालिक



**अहिराणी**

अंक १ : ऑगस्ट १९९८

# ढोल

आदिवासी बोलीभाषेचे नियतकालिक

मुख्य संपादक : अरुणा जोशी

अहिराणी आवृत्तीचे संपादकः सुधीर देवरे

भाषा संशोधन प्रकाशन केंद्र, बडोदे

**ढोल : आदिवासी बोलीचे नियतकालिक**
**अहिराणी : अंक १ : ऑगस्ट १९९८**

प्रकाशक
**भाषा संशोधन-प्रकाशन केंद्र**
६, युनायटेड ॲव्हेन्यू, दिनेश मिल जवळ
बडोदे ३९० ००७

मुद्रक
**महाराजा सयाजीराव विश्वविद्यालय मुद्रणालय**
राजमहाल मार्ग
बडोदे ३९० ००१

भाषांतर सहाय्य
**दिलीप धोंडगे**

मुखपृष्ठ छायाचित्र
**ज्योति भट्ट**

ग्राफिक्स
**चक्रधर सासवडे, कनुभाई ब्रह्मभट्ट**

मूल्य प्रत्येकी रू. २५/-, वार्षिक रू. ५०/-(टपालखर्चासह)



# अनुक्रमणिका

# संपादकना दोन शब्द

दोन्ही भाऊ अहिराणी बोलतंस, दोन्ही बहिणी, बहिण-भाऊ, मायलेक, बापलेक, मित्र-मित्र अहिराणी बोलतंस... पन जर या जोडीमजारला एकेक जण दूर गयात आनि त्यासले एक मेकले पत्र लिव्हानी येळ वनी, ते दोन्ही जण एकमेकसले मराठी भाशामां पत्र लिव्हतंस, इतका अहिराणी बोलीबदलना आमना न्यूनगंड प्रभावी शे. हाऊ न्यूनगंड फेकी देवाना आमना प्रयत्न चालू शेतस. पन अजून यश येत नही...

आनि आज कुठे गुजराथ राज्यातला बडोदा शहरात राहणारा मानोस - डॉ.गणेश देवी यासनी अहिरानीबदल प्रेम दखाडं आनि भाषा संशोधन केन्द्रातर्फे 'ढोल' ना 'अहिराणी बोली विशेषांक' काढानी तयारी दखाडी; हायी घटना फक्त अहिराणी बोली बोलनारासलेच नही, ते आख्खा महाराष्ट्रालेभी खाल मान घालाले लावनारी शे, आशे म्हणणं पडयी.

'रसिक' नावनं हस्तलिखित पाक्षिक मी आडीच वर्ष चालाडं. त्यातून अहिराणीले खूप प्राधान्य दिधं. प्रा. एकनाथ पगार यासनी कॉलेजमां आशे काम चालू शे. बहिणाबाई चौधरी ह्या- पहिली अहिराणी कवयित्री. अलिकडे तुकाराम कापडणीस नावना कवी भी अहिराणीमा कविता करी राहिनात. आणि बापूराव देसाई यासनीभी 'आख्खी हयाती' नावनी कादंबरी अहिराणीमा लिहेल शे. अजून कुठे कुठे आशा प्रयत्न व्हयी राहिनात. तरीभी अहिराणी बोली बोलनारसना मनात अजूनभी न्यूनगंड शे. मध्यमवर्गीय कुटुंबं आपला पोऱ्यासले अहिराणी बोलू देत नहीत. प्रमाणभाशामां बोलाले लावतंस. पोरसना तोंडातून चुकीसन एखादा शब्द अहिराणी निंघना, ते त्या पोरंसले, पुन्हा आशे बोलू नको, आशी ताकीद पालककडून मिळंस. कोनतीच भाशा अशुद्ध नही.. प्रत्येक भाशा फक्त भाशा ऱ्हास, आशे भाशा संशोधकसनं म्हणणं असणं तरी आपली दृष्टी अजूनभी बदलत नही, हाई आपलं दुर्दैव. आशा पार्श्वभूमीवर 'ढोल' ना अहिराणी बोली अंक निंघी राहिना, हायी खूप मोठी 'उपलब्धी' शे.

भारतमा जवळ जवळ दिड हजारनंवर बोली शेतीस. त्यासमधलीच एक 'अहिराणी' बोली शे. पन अहिराणीनं भौगोलिक क्षेत्रफळ इतर बोलीसपेक्षा खूप मोठं शे. जिल्हा, तालुका आनि गावसनी यादी देनी जई ते आशी देता यी : सटाणा, कळवण, मालेगाव, साक्री, नवापूर, धुळे, नंदुरबार, शिंदखेडा, तळोदा,अक्कलकुवा, धडगाव, शहादा, शिरपूर, चोपडा, अमळनेर, पारोळा, भडगांव, पाचोरा, जळगाव, एवढा परिसरात अहिराणी बोली बोलतंस. या जयात ढोबळ गाव. खेडा पाडा ते मोजता येनार नहीत इतका सांगता इथीन, आनि खरी अरसल अहिराणीते या खेडा-पाडासमास आयकाले मिळस.

या बोलीमाभी सूक्ष्म फरक शेतस. धुळे हायी अहिराणीनं केन्द्र शे. धुळानी अहिराणीले 'खानदेशी' आशे म्हतंस आणि जळगावनी अहिराणीले 'पूर्व खानदेशी' आशेभी म्हनतंस. सटाणा, कळवण, मालेगाव या तालुकासमा जी अहिराणी बोलतंस तिले 'बागलाणी' आशे विशिष्ट नाव शे. अहिराणी बोलीवर मराठीना खालोखाल गुजराथी भाशाना प्रभाव शे. आणि इतर भाशासनासारखा संस्कृत, फारसी, आरबी, इंग्रजी, हिन्दी शब्दभी अहिराणीमा काही प्रमाणात रूढ व्हयेल दखातंस. 'अहिराणी' हायी भाशा फक्त आदिवासीसनीच बोली भाशा शे आशे नही. नासिक, धुळे, जळगाव, नंदुरबार ह्या भागसमा सगळा बहुजन समाज हायीच भाशा बोलंस. ह्या भागातला भिल, ठाकर, पाटकोकणी, कोरकू आशा आदिवासीसनी बोलीवर अहिराणीना खूप प्रभाव दखास. अहिराणी भाशामां खूप गोडवा शे. मी 'रसिक' नं संपादन करू, त्यामा मी म्हनेल शे : ''इंग्रजसनी भाशा जर अहिराणी भाशा राहती, ते आजनी जागतिक भाशा सुद्धा अहिराणीच राहिनी असती।''

आभार.

**सुधीर देवरे**

टेलिफोन कॉलनी, एस टी. स्टॅन्ड जवळ,

सटाणा ४२३३०१, जि. नाशिक, महाराष्ट्र

# भाशा केंद्र

**गणेश देवी**

आदिवासीसनी संस्कृतीना आनि समाजना परिचय करी घेवासाठी भाशा केंद्रनी स्थापना कयी. एवढा तीन-चार वर्षसपशी संस्थानं काम करासाठी अनेक तरूण उत्साहखाल पुढे वनात. छोटा उदयपूरना श्री सुभाष ईसाई इंग्रजीना प्राध्यापक शेतस. डांग जिल्हामजारला आहवा स्टेट बँकमा काम करणारा श्री डाह्याभाई वाढु ह्या कोकणा आदिवासी संस्कृतीनां उत्कृष्ट अभ्यासक शेतस. राडीकलम इथला श्री. सुभाष पावरा गुरुजी पावरा समाजना इतिहासात रस घेतस. श्री चामुलाल राठवा ते स्वतः कविता लिव्हतंसच, शिवाय देहवाली भिलसना समाजना चौकसपने अभ्यास करतस. ह्या सगळा भेटनात, एकत्र वनात, हायी मोठं यश शे.

केंद्रना अगदी सुरुवातना काळातच श्री कानजी पटेल, डॉ. भरत नायक आनि डॉ. भगवानदास पटेल ह्या गुजराती साहित्यमजारला आदिवासीसना मित्रसना हातभार मिळना. मराठी साहित्यमजारला कवी श्री. वसंत आबाजी डहाके, श्री अरूण कोलटकर आनि श्री दिलीप चित्रे यासनी प्रोत्साहन दिधं. बागे बागे भारतना दुसरा प्रांतसमधूनबी खूप मदतना हात पुढे वनात. प्रसिद्ध चित्रकार श्री. के. जी. सुब्रमणियन, कादंबरीकार श्रीमती महाश्वेतादेवी, नाटककार श्री. विजय तेंडुलकर, कवी श्री. चंद्रशेखर कंबार यासनी गरज पडनी तधळ मार्गदर्शन जयं. आनि सगळात महत्वनी गोष्ट म्हणजे बडोदामजारली मित्रमंडळी - श्री. भूपेन खख्खर, प्रा. ज्योति भट्ट, डॉ. रविकांत जोशी यासनी प्रत्यक्ष कामात मदत देवाले सुरूवात कयी. ह्या सगळासना कष्टनं फळ म्हणजे भाशा केंद्र.

मांगला सालना मे महिनात आम्ही सापुतारा ह्या डांग जिल्हातला निसर्गरम्य गावमा एकत्र जमनू व्हतूत. केंद्रना कामना आरखडा तयार करना व्हतात. त्यामा 'ढोल' हायी नियतकालिक काढानं नक्की करायं. १९९७ मे ते १९९८ मार्च पावत चार आदिवासी भाषासमा नमुनाखातर-ज्याले इंग्रजीमा dry-run म्हणतंस - ढोल प्रसिद्ध करवा, आनि मंग १९९८ पशीन जमतीन तितक्या आदिवासी बोलीसमा दरसाल दोन अंक काढवा, आशे ठराये व्हतं. त्याप्रमाने आक्टोबरमा प्रा. सुभाष ईसाई यासनी संपादित करेल राठवी भाशामजारला ढोल ना अंक बाहेर पडना. उद्घाटनना सोहळा साधा पन सुंदर व्हता. मुख्य पाहुना व्हतात, छोटा उदयपूर संस्थानना अगोदरना अधिपती श्री. वीरेंद्रसिंग चौहान. डिसेंबर ९७ मां इंग्लंड मजारला विख्यात भाशाकोविद डॉ. डेव्हिड डॉल्बी भाशाकेंद्रात संशोधनसाठी वना व्हतात. त्यासना हस्ते, डांग जिल्हातील मोरझिरा गावमा पुनीना चांदनामा, श्री. डाह्याभाई वाढु यासनी संपादित करेल कोकना-डांगी भाशामजारली ढोलनी आवृत्ती प्रकाशित जयी. मंग १४ मार्च १९९८ ले भाशा केंद्रनी वेरियर एल्विन व्याख्यानमालामा बोलासाठी इयेल श्रीमती महाश्वेतादेवी यासना हस्ते श्री. सुभाष पावरा गुरुजीसनी तयार करेल पावरी भाषामजारली आवृत्ती आनि श्री. चामुलाल राठवा यासनी तयार करेल देहवाली आवृत्ती प्रसिद्ध जयी. सापुताराले ठरायेलप्रमाने ह्या चार भाषासमा ढोलन्या आवृत्त्या प्रसिद्ध जयात. त्यासवर वृत्तपत्रातीन लिखानभी जये, वाचकसना प्रतिसादभी चांगला मिळना. पन हायी ते फक्त सुरुवात शे. एवढ्या सालात ढोल कमीत कमी वीस आदिवासी आनि बोली भाशामा प्रसिद्ध कराना विचार शे. त्यापैकी भांतू, डोंगरी भिलसनी बोली, पंचमहालमधली बोली तशेच अहिराणी (आदिवासी-बिगर आदिवासी बोली), ह्या आवृत्त्या प्रसिद्ध व्हयी राह्यन्यात.

हाऊ सगळा खटाटोप करानमागे फक्त एकच हेतू शे. तो म्हणजे, शहरीकरणना झपाटामा आपल्या सगळ्याच

देशी परंपरा आनि आदिवासी समाजन्या संस्कृती नाहीशा व्हयी चालन्यात. त्यामजारलं जमयी तेवढं जतन करनं हायी आपलं काम शे. ते जतन न करणारसले भविष्यकाळमा हाऊ आदिवासीसना समृद्ध संस्कृतीना प्रचंड वारसा गमाडाना पस्तावा करना पडयी. ढोल ना माध्यममजारतून ह्या जनकार्यले थोडासा हातभार मिळना तरीभी समाधान वाटयी. कोनताभी नियतकालिकनं प्रकाशन कष्टप्रदच ऱ्हास. त्यामा परत आदिवासी भाशासमा प्रकाशन करनं, त्यासाठी योग्य ती लिपी ठरवनं, नियतकालिकनं वितरन करनं, हे सगळं अजून जास्त अवघड काम शे. भाशा केंद्र ह्या सगळा कामससाठी पुढें सरसायेल शे, ते मन्हा तरूण आनि उत्साही कार्यकर्तासना जीववर. श्रीमती अरूणा जोशी यासनी खूप कष्ट घीसन ढोलनी संपादकीय जबाबदारी सांभाळेल शे. डॉ. अजय दांडेकर, श्री कानजी पटेल, डॉ. भगवानदास पटेल यासनी ढोल ना कामात मनपशीन सहभाग दियेल शे. म्हणून हायी काम यशस्वी व्हयी आशा विश्वास माले वाटस. शेवट भाशा केंद्र म्हणजे फक्त बडोदा आनि तेजगड आठे वशेल एक संस्था नही, तशेच सरकारी खातं नही. भाशा केंद्रले सरकारनं अनुदानं मिळत नही. मना मते, भारतना अनेक प्रांतात पसरेल मन्हा असंख्य सहकारीसना मनात, आदिवासी प्रजाबद्दलना जिव्हाळा म्हणजे भाशा केंद्र. हायी केंद्र एक नवा विचार शे, नवी चळवळ शे. ढोल ना संपादक, त्यामा लेख लिव्हनारा आनि त्यासनं वाचन करनारा ह्या सगळाच त्या चळवळना कार्यकर्ता शेतस. आशा सगळा कार्यकर्तासना संघ म्हणजे भाशा केंद्र आनी ढोल या चळवळनं मनोगत शे.

# अहिराणी लोकपरंपरा

**सुधीर देवरे**

## बार : एक सांस्कृतिक लढाई

आखाजी (अक्षय तृतीया) नं दिवस दुपारले तीन पशीन बार खेळाले नदीना दोन्हीसकडला काठवर गर्दी व्हवाले सुरवात व्हस. लहानसपशीन ते मोठासपावत-म्हतारा कोताराभी यी बस तंस बार पाव्हाले. कळाले लागस अशा वयना पोऱ्यासपशीन ते तरणाबांड मानससपर्यंत हातात गोफन घीसन दगडी गोळा करीसनच बसतस. बार सुरू जया का इकडना मानसं त्या गांवना मानससवर दगडी सोडतंस आनि तिकडना लोक इकडना लोकसवर दगडी सोडतंस. कोनी दगडी गोफनवरी मारस ते कोनी हातसवरी. बेत करीसन एकदम हातात दगडी घिसन आशा सुटतंस कनी, तिकडना मानसं गावातच पळी जातंस. मंग त्या भी आशाच बेत करीसन इकडना लोकसवर सुटतंस आनि या लोकभी मंग जीव घी गावकडे पळी येतंस, आशी हायी एक प्रकारनी उलशी लढाईच ऱ्हास. इकडना दहा बारा आनि तिकडना दहा बारा डोकाते दरसाल फुटालेच पाहिजेत. पन एवढं जयं तरी कोनी कोनावर पोलीस केस करत नही. आनि जुनं भांडन उकरीभी काढत नही. आखाजीना बारना दिवस गया का जो तो ज्याना त्याना कामले लागी जास. इकडला मानसं त्या गावले आनि तिकडला मानसं या गावले दुसरा दिवसपशीन जावाले लागतंस. मंग आखाजीनं दिवस बारमा एकनी दुसरानं डोकं फोडेल राह्यनं तरी दुशी रोज त्या गोड बोलतंस. ती त्या सनपुरती एक लढाई व्हती यानं भान दोन्हीसले ऱ्हास म्हनून त्या एकमेकना डूख धरतं नहीत. दोन्ही गावसनी शिव बहुतेक येळे दोन्ही गावसमजारथीन जी नदी वहास, तीच ऱ्हास. बारनं येळे नदीमजार दोन्ही गावसना मांग उभा ऱ्हातस. इकडना-तिकडना पोऱ्यासले त्या दूर ठेवतंस. पोऱ्यापोरीसने दणकारतंस आनि लांबतीनच लढाई कराले सांगतंस. मांग झुमकाझुमकी व्हऊ देत नही. या मांगसवर दोन्हीकडला लोक दगडी मारतं नहीत. हाऊ एक अलिखित नियमच शे.

हायी जय दादया मानससनं. पोरीसना बार ते भयानच. सासरले जायेल पोरी आखाजीले माहेरले येतीस. आखाजीनं दिवस त्या बारसाठी नटतीस - मुरडतीस. लगनव्हयेल पोरीसपेक्षा कुवाऱ्या पोरीच जास्त बार खेळाले येतीस.

गावन्या पोरीसमधली एक पोरगी मुख्य ऱ्हास. तिले दादया मानोसना पोशाख घालतंस.. सुट, शर्ट, पायात बुट. आशे एक पोरले नटाडं का मंग त्या पोरले 'मोगल' म्हनतंस. 'मोगल' सगळया पोरीसना पुढे ऱ्हास. तिना हातात उलसा आरसा देतंस. बार खेळता खेळता मोगल दुसऱ्या गावन्या पोरीसले तो आरसा दखाडीसन गाळया देस. बाकीन्या पोरी मोगलना आजूबाजूले आनि मांगे ऱ्हातीस. एक पोर मोगलना डोकावर छत्री धरस. आशा दोन्ही गावना मोगल आमने-सामने यीसन एकमेकसले गानासमधूनच गाळया देतीस... बार खेळाले पोरीसन्या आशा बऱ्याच टोळ्या ऱ्हातीस. पोरीसना हातात टिपऱ्या ऱ्हातीस. टिपऱ्यासनी चालवरच त्या दुसऱ्या गावन्या पोरीसले गाळ्या देतीस. मोगल मात्र एकच ऱ्हास. दोन्ही गावसन्या भिलाटीसना आणखी वेगवेगळा मोगल ऱ्हातस.

दोन्ही गावसन्या पोरी बारमा एकमेकले गानानी चालवर ज्या गाळ्या देतीस, त्यासपैकी काही गाळया आशाः 'वाही वनी आकोडी, झई गयी खाकोडी'; 'साना वाटे टाका दोर, धरा धरा रम्या चोर'; 'मना निंबले निंबोळया,

सकीनी पुदले घामोळया'; 'कढं कढं गुळनं कढं, डोंगरेजन्या पोरीसले झवानं येडं'; 'एकाना घे पोरी दोनाना घे, बारानी गाडीले लवकर ये'; 'डोकावर धोनं कोनं वं, शिपाई दाद्या तीना वं'; 'डांगरवाडी कुचू कुचू, मंगीनी पुदवर बारा इचू '

आशा प्रकारन्या खूप आश्लील गाळ्या या पोरी एकमेकीसले देतीस. अश्लील हावभावभी करतीस.. पन त्यानं कोनलेच काही वाटत नही.. आजूबाजूले खूप दाद्या मानसं उभा नहीथे बशेल ऱ्हातस.. त्यासलेभी काही वाटत नहीं. कारन हायी परंपराच तशी पहिलापशीन चालत वनी. जवळजवळना कोनताबी दोन गावसमा हाऊ बार व्हस. त्यातला बराच दोन गावसना मधुनच सामाईक नदी वहास. म्हनून नदीना दोन्ही थडीसले उभं राहिसन बार खेळता येस आनि नदी हाई नैसर्गिक सीमा ऱ्हास. खाल काही गावसन्या जोडया दि राहिनू. या गावसले खूप पूर्वीपशीन परंपरा पद्धतना बार वयी ऱ्हायना : विरगाव-डोंगरेज; तळवाडा-किकवारी;आसखेडा-वाघळे; दयाने-उतराणे; सटाणा-मळगाव; सोमपूर-भडाणे आणि तांदळवाडी; करंजाड-पिंगळवाडे; पारनेर -निताणे

अशा जोडीजोडीना गावसना बार व्हस. यापैकी काही गावं ते बारसाठीच नावाजेल शेतंस. आगोदर काही वर्षसपहीले या गावसले खास बार पाव्हासाठी दूरदूरना पाव्हना इयेत. सगळा जातपातना लोक एक व्हयीसन दुसरा गावशी एक पारखभर लढेत आनि संध्याकाळे अपापला घर जायेत. पन आलिकडे खेडागावसमाभी शहरी संस्कृती घुसा लागी, तशे आता पोरीसले बार खेळाले आईबाप जाऊ देत नहीत. ''बार खेळनं आपलासारखासले शोभा देत नही. ते खालना जातसाठी शे.'' आता बारमा आशी वर्गीय जाणीव दिसाले लागी. आगोदर आशे नव्हतं. वान्या-बामन-मराठासन्या पोरीसपशी ते भिलन्या पोरीसपर्यंत सगळा बार खेळेत. पन आता तशे राह्यनं नही. बार मजारला अश्लीलपनाकडे खरोखरना 'अश्लील' सारखंच आता गाववाला लोक पाव्हाले लागात. आनि ''आमी नही त्यातला'' आशे सांगनं प्रतिष्ठानं वाटाले लागं. म्हनून बार नावनी सांस्कृतिक लढाई आज लोप पाई राहिनी.

## तोंड पाव्हाना कार्यक्रम

भिलाटीमा वाजा वाजाले लागा आणि काय, सायब्या, बाज्या, सल्या, बाप्या आनि मी धावनुत भिलाटीमा. कायभी कार्यक्रम राह्यना का आमी शेतसच तठे. मंग टिंगरीवाला राहो, नाथ बोवा राहो, भोप्या राहो, गोंधळी राहो, आडीजागरणना कार्यक्रम राहो, नंदीबैलवाला राहो, डोंबारीना खेळ राहो, गारोडी राहो नहीथे लगननं वऱ्हाड राहो...

आज गयशा भिलना चिरा मिराई रांहितात... पुढे पावरी- ढोलना वाजा. मांगे गाडीबैलवर दगडी चिरा... गयशा भिल मांगला साललेच गमी गयथा. तो कायम त्यानी बायकोना सपनात यीसन सांगे म्हणे ''मना चिरा बसाड... मना जीव गुदमरस.. माले मोकळं कर''. गयश्यानी बायकोनी सकून पाह्य कनी ते भगतनीभी तेच सांग. मंग गयश्याना पोऱ्यासनी चिरा घडायी गिधा आनि आज तो चिरा बसाडाना कार्यक्रम व्हता... आमले खेळता खेळता ऐकू वना ना, तो गयशा भिलना चिरानी मिरवणूकनाच व्हता. आमीभी जऊत ना सामील त्या मिरवणूकमा. सायब्या आनि बाज्या ते आशा नाचनात. गयश्याना पोऱ्यासनी सांबळसना वाजाभी लायेल व्हता. सायब्यानी सांबळावालासले मारोतीनी चाल लावाले लायी आनि खूप उड्या मारी नाचनात, जशा काही वांदरंच. सल्या, बाप्या ढोल-पावरीना ठेकावर नाचेत. मारोतीना पारले फेरी मारीसन मिरवणूक वनी मंग नदीकडे, तिथून ठेंगडासवर - जठे गयशा भिलले बुंजेल व्हतं-मंग तठे वनी.

गयश्या भिलनी बायकोनी आनि एक भगतनी, जठे बुंजेल व्हत त्या जागानी पूजा कयी आनि दोन चार जनसनी लगेच खंदालेभी सुरुवात कयी. चिराबरोबर बैलगाडीमां टिकम आनि पावड्याभी ठियेल व्हत्यात. माती उकराले सुरुवात जयी आनि लागा खाल मिठना थर. मंग बागे बागे उकराले लागात पावडीसवरी.. मंग फक्त हातसवरी...

आनि काय सांगू तुमले खाल गयशा भिल जशानतशा बशेल व्हता. जशा काही तो आरामखुर्चीवरच बशेल व्हता. आगोदर त्याना फेटा लागना. मीठ गयशा भिलनी छातीपर्यंत मोकळं कयं, गयश्या भिल पासपोर्ट फोटोनी निगेटीव्हनागत दखावाले लागा. एकजननी त्याना हात वर काढात... त्याना नखं आशा मोठमोठाला वाढेल व्हतात

कनी. डोकाना केस, दाढीना केसंभी तशाच मोठमोठाला वाढेल व्हतात..आमले भीतीच वाटनी पाहिसन.. जशे खरोखरनं भूतच.. सगळा म्हणा लागात, 'तोंड दिसनं बरका.. तोंड दिसन'.मंग सगळासनी नीट पाही गिधं आनि मंग गयशा भिलनी बायकोनी त्यानी पूजा कयी. पूजा जयी तशा भिलसमधला एक भगतनी अडकित्तावरी गयशा भिलना नखं कापात काहीं केस कातरवरी कापात.. आनि मंग एक हातना एक बोटसुद्धा अडकित्तावरी कापा. पन रंगत निंघनं नही... आनखी पूजा जयी आनि कापेल नखं, केस आनि बोट त्याना जवळच टाकीसन एक कोंबडं मारं आनि त्याना रंगतना टिळा दिधा. मंग गयश्या भिलवर पावडीसवरी वरली माती लोटी दिधी. खड्डु बुंजीसन वर तीन पूजा कयी आनि त्या जागावरच तो चिरा सगळा लोकसनी धरीसन आल्हाद बसाडा. चिरालेभी रंगतना टिळा दिधा. पूजा कयी.... आमी घर वनूत... मना जीव ते आशा काल्यावाल्या करीवना कनी.. मी वकनूच... आनि मंग मी आजारीच पडनू आठ दिवस..

वर जे मी प्रत्यक्ष पाहेल घटनानं वर्णन करेल शे, त्या कार्यक्रमले भिल समाजमा 'तोंड पाव्हाना कार्यक्रम' आशे म्हणतंस. हायी वर्णन मना लहानपणमा मी पाहेल प्रत्यक्ष वर्णन शे. मी आज या कार्यक्रमनी माहिति अजून करी घिधी. ती आठे या भागात दि राहिनू. 'तोंड पाव्हाना कार्यक्रम' आगोदर प्रत्येक गमी जायेल मानोसना करनाच पडे... ती त्यासनी परंपराच व्हती. जशे गमी जायेल मानुसनं 'वर्ष श्राद्ध' करतंस, तशेच भिलसमाजमा 'तोंड पाव्हाना कार्यक्रम' करतंस.

आज या कार्यक्रमनी माले निमंत्रण पत्रिका वनी आनि माले लहानपननी मी पाहेल कार्यक्रमनी याद वनी. म्हणजे हाऊ कार्यक्रम आता ते 'पत्रिका' छापीसनसुद्धा करतंस. जशा लगनंसन्या, जावळंसन्या, श्राद्धन्या, दशक्रियाविधीन्या कार्यक्रम पत्रिका छापतंस.. तशीच हायी पत्रिका मना हातात वनी...मी या कार्यक्रमले हजर राह्यनू आनि माहिती मिळायी, आता हाऊ कार्यक्रम खूप कमी प्रमाणमा व्हस. (आगोदर हाऊ कार्यक्रम प्रत्येक गमी जायेल मानोसना व्हयेच). हाऊ कार्यक्रम मानोस मराले सव्वा महिना जया का मंग नहिथे कोनीकोनी सव्वा वर्षमाभी करतंस... मरेल मानोसले जमीनमा खड्डा खंदीसन, त्या खड्डामा तळले मीठ पसारतस आनि आपू आराम खुर्चीवर बसतंस, तशे प्रेतले खड्डामा बसाडतस. पाठ मांगेभी मीठ टाकतंस म्हणजे पाठले माटी लागत नही. प्रेतनं वरतूनभी मीठ टाकतंस. आशे पुरं प्रेत मीठमजार झाकायनं का मंग उरेल खड्डा मातीवरी बुंजी देतंस. प्रेतले कुठे बुंजेल शे यानी वळखन राव्हाले पाहिजे म्हनून वळखनी दगड वरतून रोयी देतंस... म्हणजे तोंड पाव्हाना येळे बरोबर खंदता येस...

तोंड पाव्हाना येळे त्या दगडनी पूजा करीसन टिकम पावडीवरी खंदाले सुरूवात करतंस. मीठ ना क्षारमुळे प्रेतना आंगवरला केस आनि नखं वाढेल ऱ्हातस. बाकी वर्णन वरला भागात करेलच शे. निवद म्हनीसन बोकडया नहीथे कोंबडा कापीसन त्याना टिळा त्या प्रेतले देतंस. खड्डा बुंजानं येळे मीठ- माती एकत्र कालवायी जास. खरं म्हनजे बुंजताना तशे मुद्दामच करतंस. एकदाव तोंड पाव्हाना कार्यक्रम जया का प्रेत मीठमा सुरक्षित ऱ्हायेल पेक्षा मातीत मिळेल चांगलं अशा समज ऱ्हास. काही जन तठेच चिरा बसाडतंस. मात्र काही जन तोंड पाव्हाना कार्यक्रम करीसन आपली खाजगी जागामाभी दुसरीकडे चिरा बसाडतंस. कोंबडा-बोकड्यानं जेवण भिलाटीले दिधं का मंग हाऊ कार्यक्रम संपस.

## आडीजागरन : एक लोक जागर कार्यक्रम

खंडोबाना ज्या भक्तना अंगात येस आनि जो भक्त जेजूरीले जाई येस त्या भक्तकडे आडीजागरनना कार्यक्रम व्हस. लग्नना येळे आपू जशा आंबान्या फाटीसना मांडो घरसमोर टाकतंस तशा मांडो आडीजागरनना दिवस भक्तना दारसमोर टाकना पडस. भक्त गावोगावना भक्तसले आडीजागरनसाठी आमंत्रन देस.

बाहेरगावना भक्त मंग आडीजागरनना दिवसपशी पाच दिवस आगोदर आपापला गावतीन निघतंस. एक एक गावना चार-चार, पाच-पाच भक्त आपापला भंडारा, खंजिरी, डफ, तुणतुणं, चिमटा घिसनच पाये पाये आडीजागरन साठी निंघतंस. आणि एक एक दिवस एक एक गावनी वारी मांगत मांगत पाचवा दिवसले नाचत-गात-अंगात घेत-त्या आडीजागरनना गावमा - जठे आडीजागरन ऱ्हास -त्या मांडोमा पोचतंस.

मांडोनी एक दांडीजवळ एक रांजन (माठ) ठेवतंस आणि त्या रांजनवर मडकं. ज्या भक्तकडे आडीजागरन

ऱ्हास त्याले मांडोमाच अंघोळ घालीसन सोनारकडे देव घेवाले जातंस. लग्नमाभी आशीच प्रथा ऱ्हास. ज्यानंकडे आधीपशीन देव ऱ्हातस त्या फक्त देव उजाळाले टाकतंस. देव घेताले जावानं आगोदर काही भक्त वाजत-गाजत गावठानातीन कस्तुरी माती घी येतंस, मंग देव घी वनात का त्यासनी पूजा करीसन मंडपात त्या कस्तुरी मातीवर मांडतस.

ज्या भक्तकडे आडीजागरनना कार्यक्रम ऱ्हास त्या भक्तले मंडपमजारच हळद आनि पंचामृत लायीसन आंघोळ घालतंस. हायी दुसरी आंघोळ ऱ्हास. अशा पाच आंघोळी त्या भक्तले घालण्या पडतीस. भक्तले लावानी हळद सुद्धा पाच सवाष्णी मंडपातच कांडतीस. आनि पाच सवाष्णीसन्या हातसवरीच या अंघोळी व्हतीस. पाचवी आनि शेवटली आंघोळ निम्म रातले आडी खंदानं येळे घालतंस.

संध्याकाळे पाहुना भक्तसले जेवन दिधं का मंग आडीजागरनना कार्यक्रम सुरु व्हस. बाहेर अंगनमां पाच ऊससनी खोपडी तयार करतंस; खोपडी एकादशीना दिवस तुळशीना लग्नसाठी जशी खोपडी तयार करतंस तशीच. त्या खोपडीमा देवसनी स्थापना करतंस. खोपडीले धवळं उपरनं पांघरतंस. सव्वापावशेर तांदूळ, नागवेलना पाच पानं आणि सुपारी यासना खंडोबाना नावना कळस भरतंस. खोपडीमजार खंडोबानी मुर्ती नहीथे फोटोभी ठेवतंस. आनि तठेच सोनारकडतून उजाळी आनेल देवभी ऱ्हातंस... देवसनं लग्न लायीसन कार्यक्रमले सुरुवात व्हस.

मुख्य भगत 'यळकोट यळकोट, जय मल्हार' म्हनत भंडारा उधळस आनि हातात त्रिशूळ घीसन कार्यक्रमले सुरुवात करस. आगोदर गावोगावना सगळाच भक्त एकदम गाना म्हनाले लागतंस. काहीसनं अंगातभी येस. नंतर मात्र सगळा भक्त बशी घेतंस आनि मुख्य भगत कार्यक्रमना सगळा सूत्र हातात घेस. मुख्य भगतना हातात त्रिशूळ ऱ्हास आनि काही काही येळे अंगात इयेल भगतले मारासाठी तो हातात सूड म्हनजे काकडाभी घेस.

पहिला गाना संपनात का मंग मुख्य भगत खोपडीजवळ उभा राहिसन एकेक गावना भक्तसले बलावस आनि त्या भक्त आपापला विशिष्ट गाना म्हनतंस. काही भक्तसना अंगात येस. तो त्या वारामाच काहीतरी सांगस. मुख्य भगत प्रश्न विचारस. अंगात वारं घेणारा भक्त उत्तर देस. आशे करत करत मध्यरात उलटी गयी का मंग मुख्य भगत आनि ज्यानं आडीजागरन ऱ्हास, त्या दोन्ही जन आडी खंदानी जागावर येतंस. हात हात ना अंतरवर सात नागवेलना पानं ठेवतंस आनि त्या पानंसवर एक एक कापूरनी वडी ठिसन ज्यानं जागरन ऱ्हास तो भक्त टिकमना पहिला घाव हाणस. नंतर मंग आडी खंदाले सुरुवात व्हस. आडी अंदाजे दोन हात खोल, दोन हात चौडी आनि सात हात लांब आशी खंदतंस. या आडीत खैरना नहीथे निंबनाच लाकडं टाकतंस. या लाकडसले आडीजागरनसाठी 'फुलं' आशे म्हनतस. (कोनी गमी गयं ते त्याले जाळासाठी - सरनसाठी ज्या लाकडं वापरतंस त्यासलेभी या भागात 'फुलं' च म्हनतंस) हायी आडी मंग मुख्य भगतना हातवरी तोरन्या सोटयासवरी पेटाडतंस.

आडी म्हणजे चारी. जागरन कराले लावनारी आडी, म्हनूनच या कार्यक्रमनं नाव आडीजागरन शे. आडी पेटनीका, पेटेल आडीमा भंडारा आनि तूप थोडा थोडा अवधीमा मुख्य भगत टाकी ऱ्हास, त्यामुळे विस्तवनी उष्णता कमी व्हस आशी श्रद्धा शे. आडीनं शेजारच भक्तसना गाना, अंगात घेनं, नाचनं, प्रश्न-उत्तरं आशा कार्यक्रम सुरू ऱ्हास. या समदा कार्यक्रममा डफ , खंजिरी, तुणतुणं, चिमटा आशा प्रकारना वाजा उपयोगात आनतस.

आडीमा समदा आठून तिठून लालजरत विस्तव जया का मंग पहाटले आगोदर ज्यानं आडीजागरन ऱ्हास तो भक्त आडीना एक टोककडून उतरस आनि विस्तववरून चालत दुसरा टोकले येस. त्यानंमांगे मंग बाकीना भक्त आनि गावातला लोकभी आडीतीन चालत जातंस. आडीतून सगळासनं चाली जयं का, त्या भक्तले वाजत गाजत मारुतीना देवळात नमस्कार कराले घी जातंस.

गावमजार घरोघर या भक्तनी खोळ भरतंस. आनि हाऊ भगत पाहुना भक्तसले नारळ, टॉवेल, टोपी, कपडा, भंडारानी वाटी दिसन निरोप देस. आशा ऱ्हास आडीजागरनना कार्यक्रम.

(हाऊ कार्यक्रम विशिष्ट आदिवासी लोकच करतंस आशे नही. मराठा, माळी, कोळी, भिल आशा सगळया जातीसना लोक करतंस. करणारा फक्त खंडोबाना भक्त पाहिजे.)

# अहिराणी - भाषा आनि व्यवहार

दिलीप धोंडगे

अहिराणी हायी मराठीनी एक मुख्य बोलीभाषा शे. अहिराणी हायी बोलीभाषा नाशिक, जळगाव आनि धुळा हया तिन जिल्हासमा बोलतंस. धुळा आनि जळगाव जिल्हाना भागले खानदेश आशे म्हनतंस. परिसर वरून नाव म्हनून ह्या भागात अहिराणीले खानदेशी आशेभी म्हनतस. नाशिक जिल्हाना काही भागात म्हनजे बागलाण, मालेगाव, कळवण, नांदगाव, निफाड, चांदवड, दिंडोरी आनि सुरगाणा या भागात जी अहिराणी बोलतंस तिले बागलाणी आशे म्हनतंस. अहिराणीना ह्या परिवर्तन (Variations) शेतंस.

आगोदर बागलाण हाऊ एक मोठा प्रांत व्हता. ह्या प्रांतमा इ. स. १३०० ते १७०० या काळमा बागूल राजानी कारकीर्द व्हती. तधळन्या पद्धतनुसार राजवटना नाववरून प्रदेशले नांव मिळे. बागूल राजानी राजवटना प्रदेश म्हनून ह्या प्रदेशले बागलाण ह्या नाववरून वळखेत. ज्या भागनं जे नाव राहे, त्याना लिंगवरतीनच भाशानं नाव राहे आनि ऱ्हास. म्हनून बागलाणमा जी भाषा बोलेत ती भाशाले बागलाणी आशे नाव पडनं.

बागलाणमा बागुलसनं अगोदर अभिरसनी राजवट व्हती. हायी राजवट इ.स. २०३ ते ४१६ ना सुमारले सांगतस. अभीर लोक पुढे अहिर जयात. अभीरसनी -अहिरसनी भाशा म्हनून अहिराणी ! पूर्वीसना बागलाणात खानदेशनाभी समावेश व्हता. म्हनून बागलान आनि खानदेश यासनी भाशा अहिराणीच. वर सांगेल भागसमा कुठे बागलाणी ते कुठे खानदेशी बोलतस.

बागलाणी आनि खानदेशीमा काही फरक शेतस. उचार मधला फरक ठळक शेतस. उदा. बागलाणीमा 'ळ' आनि 'ड' ह्या मूर्धन्य उचार शेतस, त्या खानदेशीत नहीत. (मूर्धन्य उचार म्हनजे जिभनं पुढलं टोक-जिव्हाग्र-वळीसन मांगला कठीण टाळूले लागीसन व्हनारा उचार). खानदेशीना उचारसनं वळण बागलाणीपेक्षा मवाळ वाटस. उदाहरणार्थ भौ आनि भाऊ यातला फरक.

अभीरसनी राजटवट ज्याअथी इ. स. तिसरा नहीथे चौथा शतकमझारली, त्याअर्थी त्यासनी अहिराणी भाशाभी तेवढीच जुनी ठरस. भरतना नाट्यशास्त्रमा तिना विभाशा म्हनजे बोलीभाशा आशा उल्लेख शे. वदरूचीना व्यकणात तिना अपभ्रंश भाशा म्हनीसन उल्लेख शे.

भारतीय भाशासनं सर्वेक्षण करनारा ग्रियर्सन ह्या विद्वाननी Linguistic survey of India या नावना आपला अभ्यास खंडशः प्रसिद्ध करेल शे. ग्रियर्सन यासनी नवव्या खंडना तिसरा भागात 'खानदेशी' बद्दल म्हनेल शे, ''ह्या भागातल्या बोलीसमा खानदेशी म्हनून एक बोली शे. तिनं वर्गीकरन आजपावत मराठीनं एक रूप आशे करेल दखास. भिल्ली बोलीभी ह्या खानदेशीमा बागे बागे सरमिसळ व्हत जास. उलट खुद्द खानदेशी हायी मराठीनी बोलीच नही. खूप परसर्ग आनि प्रत्यय तशंच सदर बोलीभाशानं आतलं रूप गुजराथी आनि राजस्थानी भाशासशी मिळती जुळती शे, '' ग्रियर्सन हयासनी आशेभी मत मांडेल शे, अहिराणीना गाभा महाराष्ट्री प्राकृतपेक्षा शौर सेनी प्राकृतले जवळना शे. पन शौरसेनी आनि महाराष्ट्री ह्या समकालीन वेगवेगळा भागसमा बोलता इथीन, आशे म्हननं बरोबर वाटत नही. कालदृष्टया पाह्य ते शौरसेनी हायी आगोदरनं ते महाराष्ट्री हायी नंतरनं रूप शे, आशे डॉ. ना. गों. कालेलकर यासनी स्पष्ट करेल शे.

भा. रं. कुलकर्णी यासनी 'अहिराणी भाशा आणि संस्कृति' या नावना एक मोठा निबंध प्रसिद्ध करेल शे. ह्या पुस्तकमा त्या म्हनतस, ''अहिराणी हायी आर्यवर्गातली एक टोळीनी संस्कृतना आगोदरनी आशी पंरपंरातून चालत इयेल आनि अर्थातच स्थळकाळ परिस्थितीना कमीजास्त संस्कार व्हयेल भाशा दखास. ती मराठीनी पोटभाशा नही आनि गुजराथीनी ते आजिबात नही''.

ग्रियर्सन आनि भा. रं. कुलकर्णी ह्यासना ह्या मतं खूप टोकना मतं शेतस.

पा. मा. चांदोरकर यासनी 'खानदेश व खानदेशी भाशा' ह्या त्यासन्या प्रबंधिकामा, अहिराणी हायी मराठीनीच बोली शे, आशे स्पष्ट म्हनेल शे. उचारनी प्रक्रिया आनि व्याकरणीक प्रक्रिया समजी धिदयात ते अहिराणी भाशाना भाशाव्यवहारनी शास्त्रीयता स्पष्ट व्हयी. चांदोरकर यासनी दियेल उदाहरणसवरतीन काही प्रक्रिया पाहूत. (काही उदाहरणं बागलाणी - आहिराणी बरोबर जुळती मिळती करेल शेतंस).

**उचारणी प्रक्रिया :**

आद्य अ ना ओ व्हनं = बय - बोय

आद्य अ ना आ व्हनं = आभाळ - अभाळ नहीथे अभाय

आद्य ए ना य व्हनं = एक - यक

आद्य ओना वे व्हनं = ओतणे - वतणे इत्यादी

अनुस्वारागम : नाद - नांद, रक्त - रंगत

अनुस्वारलोप : खंत - खत, चिंच - चिच, भिंत - भित इत्यादी

स्वरभक्ती : पर्वत - परबत

मध्याखरलोप : चोरटा - चोट्टा, पोरटा - पोट्टा

घोषीकरण : सख्खा - सग्गा, थोडाच - थोडाज, तशीच - तशीज

मूर्धन्यीकरण : तत्र - तठे, मधु - मढु, पाणी - पानी

**व्याकरणिक प्रक्रिया :**

१. लिंगविचार : मराठीसारखाच अहिराणीमा तीन लिंग शेतस. स्त्रिलिंगसाठी 'ईण-इन' हाऊच प्रत्यय लागस. जशे : देशमुख - देशमुखिन, पाटील - पाटलीन.

२. वचनविचार : मराठीसारखाच अहिराणीमा वचन दोनच

(१) अकारान्त शब्दसना अनेक वचनी रूप व्हताना एकारान्त व्हस. घर - घरे, माकड - माकडे

(२) इकारान्त आनि उकारान्त शब्द सनं अनेकवचन मराठी सारखंच व्हस.

३. विभक्तिविचार : विभक्तिप्रत्यय लागानं आगोदर प्राय सामान्यरूप करतं नहीत. उदा. दामना, घरना. काहीदाव सामान्यरूपमा 'स' आशा आगम व्हस. उदा. झाडावर - झाडस्नावर इत्यादी.

आख्यात विभक्ति : अहिराणीमा कर्तानं लिंगसारखंच क्रियापदनं रूप बदलत नही. वचनसारखं बदलंस.

काही अपरिचित शब्द : कंसबाहेरला शब्द प्रमाण मराठीतला आनि कंसातला शब्द अहिराणीमा शेतस :

मुद्दाम (अद्री), अर्धा दिवस (पारग), मुलगी (आंडेर), साल (फोत्र), मुलगा (आंडोर), कुंपण (वडांग), कामोड्या (कपाशी), कावळा (हाड्या), अधेली (गवांद), हौद (हाळ), गाय (गावडी), शिडी (साटा), मूर्च्छा (झाम), हट्ट करणे (खिजी पडणे )

अहिराणी भाशाना इतिहास आनि प्रत्यक्ष भाशाव्यवहार यानी कल्पना यी, यामुळे हायी वरवरली माहिती करी दिधी.

**संदर्भ :**

१.कालेलकर , ना. गो. - *भाषा आणि संस्कृति,* १९६२, मौज प्रकाशन, मुंबई.

२.कुलकर्णी, भा. र. - *अहिराणीभाषा व संस्कृति* , १९४२, शिरपूर

३.मालशे, स. गं - 'मराठीच्या प्रमुख बोली' समावेश *भाषाविज्ञान परिचय* , १९८७, संजय प्रकाशन, पुणे.

# अहिराणीनी बांधिलकी

सुधीर देवरे

सटाणापशी २० किलोमिटर अंतरवर देवळा गावना महाविद्यालयमा विद्यार्थीससाठी दरसाल कॉलेज 'बांधिलकी' नावनं वार्षिक नियतकालिक प्रकाशित करस. महाराष्ट्रातला सगळाच महाविद्यालयं दरसाल आपापलं नियतकालीक काढतंस. पन देवळा महाविद्यालयनं येगळंपन आशे शे, या वार्षिकना संपादक फक्त प्रमानभाशा - मराठीमाच विद्यार्थीसले लिव्हाले लावतंस आशे नही, ते त्यासनी घरनी जी बोली शे - 'अहिराणी' त्या भाषालेभी प्रोत्साहन - प्राधान्य देतंस. आनि बहुतेक अहिराणी साहित्यच बांधिलकीमधून छापतंस. आपला आविष्कार अहिराणीमा करीसन विद्यार्थीभी बोली समृद्ध कराले हातभार लावतंस. पन हाऊ बोली जतन कराना शहानपना कोनले सुचना ? आनि तो आतापावत कोनी राबाडा ? ह्या तपशिलात जानं भी आवश्यक वाटंस.

देवळा महाविद्यालयमा बारा-पंधरा साल पहिले डॉ. रमेश वरखेडे मराठी विषयना प्राध्यापक व्हतात. तैनपशी त्यासनी हायी अहिराणी भाशा लिखेल सरूपात मांडाले विद्यार्थीसले सुचाडं. आनि आता प्रा. वरखेडे यासनानंतर प्रा. एकनाथ पगार हायी व्रत आजतागायत चालाडी राह्यनात. प्रा. एकनाथ पगार यासनी ते प्रत्येक सालना अंकमा आहिराणीले स्थान देवानंच ठरायेल दखास. काही इशेष अंक भी अहिराणीमा काढात. उदाहरणार्थ, आत्मचरित्र विशेषांक, खेडे विशेषांक, अहिराणी गाणी विशेषांक, मुलाखत विशेषांक अशा प्रकारना काही अंकसमा ते फक्त अहिराणी बोलीनाच समावेश शे. आणि यासनापैकी काही अंकसले विद्यापीठना पारितोषिकं सुध्दा मिळनात.

काही अंकसना मासला पाहयात ना ते या बोली भाशा अंकसना वाङ्मयीन दर्जा किती आस्सल शे हायीभी लक्षात यी. मुलाखत विशेष अंकात सरला गुंजाळ या विद्यार्थीननी एक भिलीननी मुलाखत घीयेल शे. ती मुलाखतनी सुरवात कशी शे पहा :

| | | |
|---|---|---|
| मी | : | काय मंगावू काय चालणं ? |
| मंगावू | : | कै चालीत ए खसं खसं करत ! |
| मी | : | तुन्हाकडेच वनथू. तुन्ही मुलाखत घेवाले. |
| मंगावू | : | वो बय नक्कलस सं. काय रयता ? |
| मी | : | काय नही. मी इचारसू तेवढं सांग. |
| मंगावू | : | वो बय ह् ह् ह् ह् . काय सांगता आता तुलाहे पोर तं अजिबात बोलू देत ना. अं. उगं बसा रं हाई काय म्हणं ऐकी घेवु दे. |
| मी | : | मंगावू नातूसले एवढी का बरं कंटाळनी ? |
| मंगावू | : | लई तरास देत ए ते. याळ भर उगं बसू देत ना. लई कटाळा येय माला. |

(सरला गुंजाळ)

तशेच 'स्वप्न-वास्तव' विशेषांक मा सरला वाघ अहिराणी भाशामा तिना अनुभव मांडस, तधळ आपू भालचंद्र नेमाडे नी 'कोसला' वाची राहयनूत आशेच वाटस :

काय दुष्काळना दिवस आज !

जलम जया दुष्काळना सालात. म्हंजे मी व्हयनु, तव्हळपशिन दुष्काळच पडी राह्यनात. त्या दुःखसना भरात मी मनी मायले नकोशिच व्हतू. पन म्हणतस ना, पोर ही बोखरला दोडीना येल ऱ्हास, त्याले मरणच ऱ्हात नहीं. भयानक आजारसम्हानतून सुटका करी-करी मी आज देवळापावत वनू. लहान व्हतू. गऊ पडी झोळीमातून. सगळास्नी दुर्लक्ष कयं. त्यासले वाटनं मरी गयी. पण मनी आजलीनं वाचाडं ! डोळावनात घरातला म्हणेत, जयी आंधळी. मना मोठा भाऊ व्हता, त्याले आवडू मी. पण तोच देवले आवडी गया. त्यानी डोळास्ले औषधपाणी कयं. माले दिसाले लागणं. खरा सोनाले देव कस लाई लाई मारस, त्याले पोटदुखी लागी व्हती. भलता पैसा मोडात, पण येशच नही वनं. माले ते आठवत नही कारण त्याना पोरगाच मना बरोबरीना शे.

( सरला वाघ)

आणि आत्मचरित्र विशेषांकमा लता थोरात नावनी विद्यार्थिनी म्हनस. :

मना जन्म बागलाण तालुकामा निबोळाले जया. मी थोडी मोठी जऊ. (५-६-वरीसनी) माले जरा जरा समजे. माय व जीजी या चावळेत, हाई पोर ना भलती खंतड शे. तवळ मनी माय म्हणे, तीना जन्म शनिवारे व्हयेल शेना ! तवळ माले समजनं मी शनिवारे जन्मले वणू-म्हणून माले वाटे, मना मागे शनि लागई का काय ? पण खरंच मनं लहानपण भलतच गरीबीतून गयं. मनं नाव पहिलीमा घालं, तवळ मना काका- चुलता येगळा निघनात. मना बापना वाटाले घर वनं नई. म्हणून आम्ही मळात राहावाले गऊत. गावपसून आमना मळा एक कोसवर शे. तिठून मी अन् मना भाऊ सुरेश (बापू) गावात शाळात इवूत. पायमा चपला नव्हत्यात. म्हणून थंडीना दिवसात आमना येवाजावाना काय हाल त्या ! एक तर शाळा सकाळीसनी राहे म्हणून पायले भलत्या काकऱ्या टोचायत. आंगवर सोयना कपडा राहेतना. तवळ गरम नरम शे कोणले माहीती : काही दिवस थंडीना जायेत जेवन येळवर मिळेना. तवळ चपला शेत कुठे ? एवडा तरास काढिसन शाळात येनंच पडे. शाळाले येवाले उशीर जयाका गुरूजीना हातना मार खानंच पडे. कवळ कवळ उशीर जया तं आम्ही मारूतीना देवळात लपी राहूत. शाळा सुटाना टाईमले मळाकडे निघूत. एखादी यळे १० पैसास करता गुरूजी घर काढी देये त. काही यळले मार खावाना धाके पेन नही आशेनिमित करीसन कुठेबी लपी राहूत.

(लता थोरात)

या जयात काही ' प्रातिनिधिक' उदाहरणं. पन अहिराणी भाशानं लेनं नीट पाव्हासाठी या सगळा अंक आपू मुळातीनच वाचाले पाहिजेत. देवळा कॉलेजना प्राचार्य हितेंद्र आहेर सुद्धा स्वत : अहिराणी भाषिक शेतस. त्यामुळे ह्या सगळा प्रयोगनी त्यासले चांगलीच आस्था शे. देवळा कॉलेजनी यापुढेभी भविष्यात अहिराणी बोली बद्दल आशीच आस्था दखाडवा आशी अपेक्षा करूत.

# अहिराणीनं भाशाविज्ञान

**राजेन्द्र पवार**

उत्पत्ती : जशी मराठी, संस्कृत, प्राकृत, पाली, अर्धमागधी, पैशाची आनि शौरसेनी ह्या सहा भाशास्पशी तयार व्हयेल शे आनि इंग्रजी-ग्रीक, लॅटिन, फ्रेंच, अँग्लोसॅक्सन आनि जुनी इंग्रजी आशा पाच भाशास्पशी व्हयनी तशीच अहिराणी बोली - मराठी, गुजराती, हिन्दी आनि थोडी बहु मूळ पाली आनि राजस्थानी मिळीसन उपजनी आशे म्हनता ई. याना अर्थ अहिराणीमझार सोताना शब्द, तिन्ही सोतानी पद्धत नही, आशे नही. अहिराणी बोलीना सम्मन ऑस्ट्रिक भाशापावत लई जाता येतस. त्यावरथी अहिराणीना इतिहास, अस्तित्व आनि निर्मिती प्राचीन काळपशीशे आशे म्हनाले जागा शे. तशाच तिनामा काही बंगाली शब्दसुद्दा येतस, त्या यकदम कमी. त्यावरथी तिना सम्मनसंगेबी व्हई का ? यानं उत्तर देताखेपे खालनां काही शब्द पहा. ज्यास्नामा आशे दखास की, एकमेक भाशास्ना काहीच सम्मन न ऱ्हाईसनबी (कुळनाबी सम्मन नही) त्यास्ना मसस सारकापना दिसस : फ्रेंच : नोम, इंग्रजी : नेम, हिन्दी : नाम; स्पॅनिश : मुस, अहिराणी : मस; रशियन : साखर, मराठी : साखर; इंग्रजी : व्हिक्टरी, तामिळीः वेट्री; किस्वाहिळी : मीमी, मराठी : मी; अरबी : मौत, संस्कृत : मृत्यु; फ्रेंच : मेझाँ, अरबी : मकाँ; फ्रेंच : दीव, मराठीः देव.

आखो दुसर्‍या गुनधर्मस्नी गोश्ट आशी :

१. जपानी '-क' आनि अरबी '-क' (विभक्ती 'तुले') सारका.

२. उतर आनि मध्य भारतन्या भाशा आनि द्राविडी कुळन्या भाशासनी वाक्य लिव्हानी पद्धत (कर्ता +कर्म + क्रियापद) सारकीस शे.

३. अरबी आनि जपानी भाशास्मझारबी वाक्य लिव्हानी पद्धत सारकी शे.

४. इंग्रजी आनि किस्वाहिली भाशास्मा वाक्य लिव्हानी रीत सारकी शे.

अहिराणीना उत्पत्तीले तिना भौगोलिक प्रदेश कारन शे. तिना प्रदेश (जळगाव, धुळे, नंदुरबार आनि नाशिक जिल्हामझारना कळवन, सटाना, मालेगाव ह्या तालुका धरीसनी ) गुजराती, राजस्थानी, हिन्दी, मराठी प्रदेशस्वरी घेरायेल शे. त्यावरी त्या सगळा भाशा यकत्र ईसनी ती तयार जई. म्हनजे तिना सोताना शब्द गुनधर्म नहीत आशे नही. तिनामा आशा काही शब्द शेतस ज्या आजुबाजून्या भाशास्ले जरासाबी जुळतत नहीत. आखो हाईबी निरखी पाव्हाले पाहिजे की, पूर्व आनि पच्छिम खानदेशी अहिराणीमझार काही पाली शब्द येतस. येकमेक जवळजवळन्या भाशा यक ठिकाने यकत्र ईसन यक बोली तयार व्हस आशे म्हंतं तं मंग कैकाडी, वैदू, वडरी, परधानी, गोरमाटी, गोंडी ह्या बोलीस्नं काय ? त्या कथाईन वन्यात आनि तयार कशेकाय जयात. त्यास्मझारला गुनधर्म पुरा दक्षिन भारतीय भाशास्ना शे. अहिरानीनी निर्मितीना विचार करताना जितंत उधारन उर्दू भाशानं देता ई. उर्दू, अरबी फारसी हिन्दी या भाशास्पशी तयार जई. मुसलमान राजाकडे अरबी, फारशी आनि हिन्दी बोलनारा सैनिकं ऱ्हायेत त्यास्ले यकत्र ऱ्हान पडे. आठे येकमेकसंगे बोलताना त्यास्ले आडचन इये. मंग त्यास्नी सगळास्नी मिळीसनी उर्दू भाशा तयार जई. यानागतस वऱ्हाडी, राजस्थानी, गुजराती, मराठी आनि हिन्दी भाशा जमीसन अहिरानी. तयार व्हयेल वाटस. समुद्रमा येखांदी जागा आशी ऱ्हास ज्याठिकाने खारा पानीना, थंडा पानीना, गरम पानीना, गोड पानीना प्रवाह मिळतस आनि नवीन तापमानना आनि नवा खारापनाना प्रवाह बनस. तीस गोश्टे अहिराणीनागत बोलीनीबी ऱ्हास.

गुनधर्म : काही विद्वानस्ना मते अहिराणी गुजरातीनी बोली शे, तव्हळ काही तिले मराठीनी बोली म्हनतस.

दोन्ही विचारस्मा तथ्य शे.

**गुजरातीनी बोली**

| गुजराती | मराठी | अहिराणी |
|---|---|---|
| छे | आहे | शे |
| थशे | होते (भव) | व्हस |
| जाशे | जाते | जास |
| करशे | करतो | करस |

विभक्त्या :

| | | |
|---|---|---|
| रामनी | रामाची | रामनी |
| घोडोना | घोडयाचा | घोडाना |
| माणसमाथी | माणसांतून | मानोस्माथी |
| त्यावरथी | त्यावरून | त्यावरथी |
| लईने | आणून | लईसन |
| चोरायेल | चोरले गेलेले | चोरायेल |
| लखी | लिहून | लिखी |

**मराठीनी बोली**

| | | |
|---|---|---|
| खांड | साखर | साकर |
| सारू | चांगल | चांगल |
| घणो | खूप | भयान |
| सुधी | पर्यंत | पावत |
| निकळी पडया | निघाले | न्हिंगी पडनात |
| हु आव्या | मी आलो | मी वनु |

मराठीमाबी नहीत : गुजरातीमाबी नहीत आशा अहिरानी शब्द :

| | | |
|---|---|---|
| हाथथी | हाताने | हातेवरी/घाई |
| - | त्यापेक्षा | त्यासाई |
| हाथमां | हातात | हातमझार |
| हाथोमां | हातामध्ये | हातस्मझार |
| शा माटे ? | कशासाठी ? | कसा गुंता ? |

अहिराणीमझार 'अ', 'ण', 'ष' ह्या अक्षरस्नाआयवजी 'अ', 'न', 'श' वापरतस. आनि विशिष्ट भौगोलिक प्रदेशमुळे काही अक्षरं निरस्ता बोलता येतस. लिव्हातांना तरास व्हस, आडचन येस. शब्दयोगी अव्यय लावतांना शब्दमझार विकार व्हतं नहीत :

१) जेवण = जेवन, अपमान = आपीमान, विशेष = विशेश.

२) आमची = आम्हनी, व्हय्ना (झाला), दामोखी.

३) डबा =डबामा, डबाना, डबावर, डबाखाल, डबामुळे.

अहिराणी जरी विभागीय बोली शे तरी तिनामा इतर भाशास्ना विचित्र संगम शे. राजस्थानी भाशामाना 'आठोंग', 'गया', 'राज', बंगालीना 'बासन' सारका शब्द, तामिळीमधला 'येरोन्येर', संस्कृत 'दूर', पाली भाशाना 'हेटे', उन्हं', 'पागरी' यास्नासारका शब्द ठळक दखातस.

बोली आनि उपबोली : अहिराणी हाई सोतास यक बोलीभाशा ऱ्हाईसन तिन्ह्या काही उपबोलीबी शेतस आशे दखास. त्यास्मझार भिलाऊ आनि उत्तर कोकनी बोली ठळक शेत तं पंचाळस्नी बोली गुजरातीले जराशी जास्त जवळनी वाटस. ह्या तिन्ही बोलीस्मा अंतरबी शे आनि सारका पनाबी.

भिलाऊ : नावरथीस कळस की, ती बोली फक्त भिल लोकं बोलतस. अहिराणीनास उपविभागमझार ती बोलतस. इले अहिराणीनी उपबोली आशा करता म्हनता ई की, जसे मराठी, गुजराती उचारस्मा सुलभता ईसनी अहिराणी तयार व्हयनी, तशी अहिराणीमझार आखो उचरसुलभता ईसनी भिलाऊ जलमेल वाटस. अहिराणीना आनि मिलाऊना हेल न्यारान्यारा शेत.

| मराठी | अहिराणी | भिलाऊ |
|---|---|---|
| मला माहीत नाही | माले माहीत नही | माथं माहीत ना |
| कुठे गेला ? | कथा गया ? | कई गयाल ? |
| तो बघ/पहा | तो पाह्य | ता जो/दख |
| कोण जात आहे ? | कोन जाई ऱ्हायनं ? | कोन जाई ऱ्हईत ? |
| कोणाला दिले ? | कोनले दिधं ? | कोनथं /कोन्ला दिना (ल्) ? |
| तुम्ही गेले होते ना ? | तुम्ही गयथात् ना ? | तुम्हीं गय्लाल नं ? (भिलाऊमझार नपुंसकलिंग नही.) |
| तिचे नाव काय आहे ? | तिन्हं नाव काय शे ? | तिन्हा नाव काय सं ? |
| कोणाचे जित्राप आहे ते ? | कोनं जित्रब शे ते ? | कोना जित्राप सं ता ? |

**उत्तर कोकनी बोली :** इखडली उत्तर कोकनमानी कोकनी लोकस्नी 'कोकनी बोली'. इना हेल अहिराणी आनि भिलाऊसाई न्यारा शे. ह्या हेलमुळे आनि जरासा येगळा शब्दस्मुळे ती न्यारी वाटस. (हाऊ इचार करताना महाराश्ट्रना येगयेगळा विभागस्मानी मराठी, त्यास्मधला किरकोळ दुसर्ला शब्द आनि हेल घ्यानात ठेवाले पाहीजे.

| मराठी | अहिराणी | उत्तर कोकनी बोली |
|---|---|---|
| आहे | शे | हावं |
| अरे बापरे ! (आश्चर्य) | अरेब्बापरे ! | ईबा ! |
| मुलगी/मुलगा | पोर/पोऱ्या | पोशा/पोशी |
| म्हातारा / म्हातारी | म्हतारा / म्हतारी | डोशा / डोशी |
| सगळं | सरं / बठं | सबन् |
| इकडे / तिकडे | आथं / तथं/आठे/ तठे | इठे / तठे / अंगं / तंगं |
| तुला बघून घेईन | तुले पाही घेसु | तुला हेरी लेसु |
| हळूच | बागेस | वजज |

**पंचाळस्नी बोली**

पंचाळस्नी बोली गुजरातीले मस जुळस. उच्यारबी गुजरातीनागतस करतस. मराठीपशी मस लांब पडस.

| मराठी | अहिरानी | पंचाळी |
|---|---|---|
| खूप बोलतोस | भयान् बोलस | घनो बोलस |
| काय घेतेस? | काय घेस ?<br>काय घी न्हायनी ? | सु लेरीस ? |
| मी बोलतो / बोलले | मी बोलनु | हुं बोलनुं |
| इथेच टाकून पळाला | आठेस टाकी पळना | हाईज् न्हाकीन् न्हासना |

गुजरातीमा नाम जशे शेवटला अक्षरले उकार दीसन लिव्हतस तशे पंचाळीबोलीमाबी करतस. उधा. कादुं. कोयडु.

**अहिराणीमझारला प्रादेशिक भेद**

अहिराणीमझार आखो प्रादेशिक भेद शेत. जो भाग हिन्दी प्रदेशले जवळ त्यावर हिंन्दीना प्रभाव जास्ती, ज्याले गुजराती जवळ त्यावर गुजरातीना आनि ज्याले मराठी जवळ त्यावर मराठीना प्रभाव जास्ती दिसस. हाऊ इचार करनाना यक गोश्ट नक्की कळस की, ज्या विभागले समुद्र जवळ शे तिनामा आशा काही शब्द मिळतस ज्या गुजराती-हिन्दी-मराठी ह्या तिन्ही भाशास्मा मिळतत नही. आशी येळे ध्यानात घेनं पडस की, प्राचीन काळात समुद्रमार्गे कोनावरी तरी परदेशी भाशा आठे आनायनी. तिना प्रभाव आजपावत आशामुळे टिकना नही की, नंतर गुजराती व्यापारीस्मुळे आनि मुसलमानी आनि दुसर्‍या आक्रमनस्मुळे त्यास्मा अंतर पडी गयं व्हई. तरीबी काही काही शब्दस्ना अजिबात थारा लागत नही. त्यावरथी म्हनता येस की, समुद्रपारनी भाशासंगे अहिराणीना सम्मन व्हता. आस्ट्रिक भाशासंगे सुद्दा अहिराणीना सम्मन शे. त्यामाना कमी शब्द आटे मिळतस. अहिराणीमा पहिला फरक बागलानी आनि खानदेशी आशा करता येई. बागलानी अहिराणी गुजरातीले आनि मराठीले जवळ पन व्हाडीले लाम त्यामुळे बागलानीमा ‘ळ’ ना ‘य’ व्हत नही. बागलानीना उच्चार जड आनि भरडा व्हातस. दर दहा किलोमीटरले भाशा/बोली बदलस, त्या नियमखाल बागलानपशी (कळवन, सटाना, मालेगाव) तं जळगावपावतना अहिराणीमा बदल व्हत व्हत जास. बागलानीना उच्चार गुजरातीनी लय धरीसनी, धुळाले हेल मधला आनि जळगावना हेलकावा व्हाडीना विशेश पना घरीसनी. निस्ता हेलस नही तं शब्दसुद्दा न्यारन्यारा दिसतस. आपू त्यासनी तुलना करू.

| बागलानी<br>(कळवन, सटाना, मालेगाव) | पच्छिम खानदेशी<br>(धुळे, नंदुरबार) | पूर्व खानदेशी<br>(जळगाव) |
|---|---|---|
| ‘ळ’ना जागे ‘य’ वापरतत नही | ‘ळ’ना जागे ‘य’ वापरतस | ‘ळ’ना जागे ‘य’ वापरतस |
| अनेकवचन करताखेपे शेवटना अक्षरना ठळक उच्चार करतस. | अनेकवचन करता खेपे शेवटना अक्षरवर मात्रा लावतस. | अनेकवचन करता खेपे शेवटना अक्षरवर मात्रा लावतस. |

(उदा. लोक-लोक, लोक-लोके, मनोस-मान्सं, मानोस-मानशे, वावर-वावरे, वावर-वावरे)

| | | |
|---|---|---|
| गुजराती-मराठी शब्द जास्ती म्हनी न्यार्‍या न्यार्‍या | हिन्दी शब्द जास्ती | |

**उधारनना वाक्य :**

| | | |
|---|---|---|
| सरास्ना/सगळास्ना जेवनं जयात मस दिवस्पशी पाहेल नवथं. | बठास्ना जेवने झायात मुतला दिनपशी दखेल नवथं. | बठास्ना जेवने झ्यायात् गची दिनपशी जोयेलं (देखेल) नवथ |
| म्हाताराले जरासा ताप वना आनि त्यावातच मरी गया. | धेडयाले जराहा ताप उना आनि त्यामास गमी गया. | धल्लाले जराहा ताप उना आनि त्यामास गमी गया |
| रंगवरी केस काळा करी घिदात | रंगघाई बाले काया करी ल्हिनात् | रंधाई बाले काया करी ल्हिदात |
| गोधडया घरात ठेव | झावरी घरमा ठेव | झ्यावरी घरमा ठेवा |
| सकाळ न्हिंगी जासु | सकाय न्हिंगी जासु | कालदिन न्हिंगी ज्यासु |
| त्यानाजवळस मन्हं घर शे | त्यानाजोडेज मन्ह घर हे | त्यान्जोढेज मन्हं घर हे |
| मोरीमझार धुनं धुवाले माले नही आवडत् | न्हानीमा/मोरीमा धुनं धोवाले माले नही पटस् | न्हानीमा धुनं धोवाले माले नही पटस् |
| रागे रागे उटना सोता | तनके तनके उठा सोता | तनके तनके उठा सोता |
| सतेलामाथुन पानी घी वना | गंजीमाहीन पानी घी उना | गंजीमाहीन पानी घी उना |
| भल्ता / भयान पळस | उजी पयस् | उजी पयस् |
| दाळ (शिजाडाले) टाकी दिधी | दाय वैरी दिधी | दाय वैरी दिनी |
| हाऊ त्यासाई उलसा शे | हाऊ त्यासवाई धाकला हे | हाऊ त्यासवाई धाकला हे |

**बागलानी अहिराणीना उतारा**

दूरथून तिले दिशी नही ऱ्हायन्तं. डोळा तानी माले वळखानी काकोळीत करी ऱ्हायन्ती. वळखती तं दूरथीन धावत ईसनी बिलगी पडती. जवळ गऊ तव्हळ् वळखं. पदरवरी मन्हं तोंड पुसं. तिन्हासाई मी नेहेमीस लहान ऱ्हासु. लाव कराले लागी. वय गयं दिशेना, तशीस काम करे. ऱ्हावायन् नही माले, मीस उठनु म्हन्तं :

''लय मी करी घेस, बाजुले बशी घे''.

''करस ना मी, तू दमी वनीस, दम खाई घे''

''बोल ना, मी बोलसबी करसबी''

''हाऊ कितलीमा गया?'' मन्हा पोऱ्याकडे (आंडोरकडे) पाहीन् इचारं.

''मी पाचवीमा गऊ.'' तोस बोलना.

बोलत चावळत याळ गया. मन्हा आवाज आय्की शेजारन्या बायाबी ई लाग्या व्हत्यात्.

**खानदेशी (अहिराणीना) उतारा**

धुये, जयगाव मुतला मोठला शहरे हेतस्. तठला लोकेबी मोठला. बठा बिचारा गोड बोलतस्. कोनबी लगीन यावमा ऱ्हाव येतस-जातस. हाऊ आपला घरना लगीनमा उना नही म्हनीसन् रूसतस् नही. आपू च्याल्ना ज्यातस्. मंग ज्यान्हा लगीनमा ज्यातस त्याले खिसानं वाटावाचून ऱ्हाई का? त्यान्हागुंता मंग इयेल पाव्हनाले माऱ्हे-मोऱ्हे करी चाल्तस्. त्यावरी पाव्हनानाबी रोस गई ज्यास्.

लगीनमा सैपाकनी तऱ्हा न्यारी. मुतलं चौड चुल्हांगन करवो. जंगलमाहीन लाकडे आनवो, गची लाकडे. फटाफट तोडीन् फेकवो. चटकरी बळी उठतस्. उठा उबळा की, ठेवी कढ्ई नही ते डेग. भात, उसय (घुगरी) दाय गयाडी (शिजाडी) ल्हिनी की, झाया सैपाक . येरोन्येरले मदत करीसनी बठा लोके कामे करतस.

# चांदनामा ओरसंग नदीनी धारबरोबर

गणेश देवी

मी तेजगडले जव्हळ पयल्यांदा गऊ तव्हळ भाषाकेंद्रनी कल्पना नवी व्हती. आदिवासी संस्कृतीना अभ्यास करना व्हयी ते आदिवासीसना गावमझारच एखादी जागा मिळाले पाह्यजेल अशा हेतू व्हता. तेजगड पाह्य, तिथला कोराजना डोंगर, दाट झाडं, मवळा स्वभावनी व एक पायवर मदत कराले तयार अशी तठली ग्रामपंचायत हे बट्टं भयान आवडनं. तेजगडलेच भाशा केंद्रनी जागा नक्की करी टाकी. या सगळ्या गोष्टीसले आते दोन चार साल व्हयी गयात. या काळमझार तेजगडले जवळथून पाव्हानी संधी मिळनी.

'बाबो पिठोरो' या आदिवासीसना देवबद्दल अगोदरपसी ऐकी व्हतू. अचानक, तेजगडमझारल्या दोन घरस्मान पिठोरा देवना चित्रं पाव्हाले मिळनात. त्यास्पैकी एक घरमान एक शिकेल जुवान भेटना. त्यानं नाव नगीन. पुढे नगीन व त्याना बाकीना आदिवासी सोबती मनाबरोबर तेजगड व आजूबाजूना टापूमा फिराले लागनात. कोराजना डोंगरमा जुना काळन्या गुफा सेतीस. त्यासनामझार हजार साल अगोदरना रंगाडेल घोडास्ना चित्रं सेतस. लोखंडना चुरा वापरी बनाडेल रंगवरी रंगाडेल या पशानयुगातला चित्रं आजबी जशानतशा वाटतंस. डोंगरना माथावर तेराव्वा शतकमझारली राणी तेजल इनी बांधेल कोट से. त्याना बाहेरमझार जुनी राजधानीन्या पडलझडेल खुना शेतीस. आत्ते ज्या खुना शेतीस त्यावरथून कव्हळ तरी आठे चांगली सिरीमंती संस्कृती नांदेल व्हई एवढं मात्र खरं ! नगीनना घरात रंगाडेल पिठोरा चित्रमान या बठ्ठया सिरीमंतीनी-याद पडी जायेल काळनी-छाप उमटेल दखास. त्या भल्ला मोठा चित्रमझार एक जुनी व मोठी संस्कृतीना बराज पदर पाव्हाले मिळतस. पिठोऱ्याना तळले दबा धरी बसेल दोन वाघ सेतस. त्यासनापरमानेज जो खोल पाही त्याले तो इतिहास घेरी टाकस. बाकीनासले मात्र आदिवासी समाज म्हणजे मागासेल -बिगर इत्यासनाच वाटत ऱ्हास.

खूब येळा शेहरना रस्त्यावरथून फिरत ऱ्हावा तव्हळ आदिवासी आपला कुटुंबबरोबर जातायेता दखातस. मोलमजुरी करा करता शेरात इयेल, कोनाशी न बोलता चालत ऱ्हानारा. शेरातला लोकभी त्यासनापसी अलगच ऱ्हातस. सरकारना हापिसात, दवाखानामा, पोलीस कचेरीमा त्यासले हिटफिटनीच वागणूक मिळस. वर्तमानपत्र, सिनेमा, टीवी यासना मझार आदिवासी बद्दल फक्त दखावा दखाडापुरतंच लिहेल ऱ्हास. त्यान्या भावना, त्याना अभिमान, त्याना जुना इत्यास याले कुठे च जागा ऱ्हात नही. आदिवासीजना देव, सन, उच्छाव, नाच, रंगीबेरंगी कपडा, मनीमाळा,डागिना, घरं, तिरकामठं हे सगळं शेरातल्या लोकसनी पाहीन कर्मणूक व्हवाला पाह्यजेल यासाठी गोळा करी ठेवतस. आदिवासी म्हणजे आत्येना जीवनवर पडेल आंधळी श्रद्धा व अग्याननी काळी सावली अशा सोयखाल काढेल इचार से. अशा इचारपुढे व तो इचार जो समाज करस त्यान्या तांत्रिक शक्तीपुढे बिचारा आदिवासी दुबळा व्हनार नही ते काय व्हई ?

इत्यासना एक नेम से. ज्या समाजजवळ पसूनं तांत्रिक ग्यान ऱ्हास तो समाज इत्यास लिवावरभी कब्जा करस. पुढे पुढे मग समाज मझारंला इतर घटक बागे बागे बुडी जातस. आज ते भारतमझारला ज्या मेढ्या धारवाला सेत त्यासनी आदिवासीसना इत्यास अशाच सपाट करी टाका. आदिवासी कोण सेत, त्यासनी परंपरा किती जुनी से,

त्यासनं भारतनी संस्कृतीमा स्थान किती जुनं से या बड्डा प्रस्नवर या परमुख धारमझारला इचारवंतसनी मुकं व्हयी बसानं ठरायेल से. म्हंजे आदिवासी हाऊ देसनी परगतीनी मोठी जत्रामझारला चुकीसन सेवटना रायेल पोऱ्या व्हयी अशा दखाडा निर्माण करेल से.

पण खरी बात से उल्टी से. आदिवासी संस्कृती ते भारतमझारली सर्वात जुनी व सुधारेल संस्कृती से. दुसरा देसन्या अनेक चक्कीसमा जी भरडायनी नही, टिचनी नही, खूब झगडीसन ती आदिवासीसनी संभाळी ठिई. खरं बोलानं ते ही भारतमझारली पुरी स्वतंतर राहेल संस्कृती से.

आर्य व त्यासना नंतरना भारतना लोक जुमीन कसाले लागात. पातापाता त्यासनी जमीन उत्पन्नमझारतून बजार भरायात. निसर्गना भांडवलमा खेळ मांडा. त्यानंतर जातनी येवस्था काढीसन कष्टना बदल एखादी इकाटिकानी वस्तूमा करी टाकं. यावातून अशा समाज तयार कया की ज्याना संबंध धड नही निसर्गशी नही माणोससी. याले आणखी वरथून संस्कृतीनं नाव दी टाकं.

आदिवासी मात्र निसर्ग व मानुस या दोन्हीसबद्दल प्रेम ठी से. पोटपुरती सेती कसवा-फायदानी त्याले आपेक्षा नही. कष्टशिवाय जगनं बरोबर नही. उत्पन्न आपलापुरतच ऱ्हात नही, ते सर्वाससाठी ऱ्हास. ते वाटीनिटी घेवा हे सगळं आदिवासीले आजभी कळस. तोच त्याना धरम से. यामुळे तो आजभी वावरनी, झाडस्नी, बीभरननी पूजा करस. याना उलट परमुख समाजमा जमीन, बीभरण, झाडं या सर्वसनी इक्री करतंस. एवढंच कसाले, देवनी मूर्तीभी इकत घेतस. मानसं सोतानी इक्री करतस-इतरस्ले इकत घेतस.

आदिवासीसमझार येश्य ायेवसाव नही. हुंडा घेवानी नवी पद्धत त्यासनामा येवाले लागी. इतर समाजमुळे ते व्हवाले लागं. पूर्वसले हुंडा न घेता देता त्यासना लग्नं व्हयेत. आते सगळं बदली चालनं. पंचमहालना मना आदिवासी सोबतीसले लगीनसाठी आते इस ते तीस हजार रुप्या मोजना पडतस. हातेपदरे पैसा ऱ्हातं नइत ते कर्ज काढनं पडस. कर्ज फेडासाठी बडोदा, भरुच, सुरत यासारखा दूरदूरना शेरसमझार बांधकाम येवसायात तीन ते चार साल खपनं पडस.

मांगला शतकपावत (एकोणीसवं शतक) आदिवासीसनी जमीनवर आपला मालकीहक्क लिहेल नव्हता. गोरा लोकसनी राजवट वनी. कर वसूल करा करता जमिनी मोजाले लागात. ज्यासले कर चुकाडनं व कर भरनं शक्य व्हतं त्यास्नी आदिवासीसन्या जमिनी बळकाड्यात. त्या जमिनीवर शेती कसानी मुभा देवाना बदलात अनेक पिढयासना येठबिगार करी टाकात. सरकारना हुकूम निघनात. तो म्हने-आरे ही जमीन ते मी चंद्रसूर्य जनमनात तईनथून करी ऱ्हायनू. सरकार म्हननं-कागद से का तुनापन ? कागद ते सावकारपन से. आदिवासीले निकस जमीनकडे ढकली दिधं.

पूर्वेसना काळपसी आदिवासीले जंगलनी माहिती व्हती. कोनती वनस्पतीना उपेग कोनता रोगसाठी करानां. किती सालनंतर त्या वनस्पतीनी लावनी करानी, त्यानासे काय बोलानं-त्यानं काय ऐकानं-हे समदं त्याले ठाउक व्हतं. गोरा इंग्रज वनात, जंगलं सपाट जयात. इंग्रजसले सैनिकसले घी जानं व पवसाडी जानं असे करनं व्हतं. त्यासना दारुगोळा- हत्यारं सुरतहून कलकत्ताले पवसाडनं व्हतं. इंग्रजसनी पाहे की आगीनगाडीना रूळ टाकना व्हती ते त्यासना खाल लाकूडना पाटा लागती. त्यानी आदिवासीसले हुकूम सोडा. आदिवासीसनी गोरा इंग्रजले तीरकामठावरी उत्तर दिधं. जवळपास शंभर सालं अशी लढाई चालनी. पण तवपावत भारतमझारली येपारी मंडळी इंग्रजसले जाई मिळनी व्हती. बिचारा आदिवासी एकटा पडा. आखेर सेवट त्यालेभी इंग्रजना हुकूम मान्य करना पडा. इंग्रजसनी आदिवासीसना जंगलवर आपला हक्क लिया. त्यानाच कष्टमझारथून जंगलनी तोडनी जयी. आगीनगाडीना रूळ समधीकडे फिराले लागनात. अवषद देवानी आदिवासीसनी वनस्पती कमी व्हई गयी. त्याना आहार निकस बनना. तीरकामठं त्यानं पूजानं साधन बननं. इंग्रज अधिकारीसले केवळ कर्मणूक म्हनी शिकारना परवाना मिळनात. आदिवासीले मात्र ससा-हरण माराबद्दल शिक्षा व्हवाले लागी. या सगळाना परिणाम म्हणजे आदिवासी प्रजापैकी ७/८ कोटी प्रजाले मका, वरी, नागली खाईसन याळ काढना पडात. बुतेक प्रजा खावानी आबाळमुळे बळी पडनात.

तसे पाहे ते आदिवासीनी बुद्धी तरळ. शेकडो कथा-गाना त्याना तोंडपाठ ऱ्हायेत. या गानासमा, कथासमा त्याना इतिहास ऱ्हाये. त्याले समदं ठाऊक व्हतं. ते त्याले याद व्हये. राम दंडकना जंगलमा कशा गया, अशोकना त्यानं काय नातं व्हतं, राना परतापले त्यानी काय मदत कयी, इंग्रज त्याले कशा भ्याये-हे समदं . पन स्वतंतर भारतमान आदिवासीनी भाशावर संकट वनं. त्यानं जंगल, जमीन, अवषद, आहार, प्रानी हे समद काढी घिसन त्यानी भाशाभी काढानं ठराये. सरकारनी नेम घिसन ठराये की, राज्य चालाडनं व्हयी ते इतक्या भाषा जित्त्या ठीसन चालनार नही. जेवढ्या भाशा मारता इथी तवढ्या. मारी टाकान्या. देस स्वतंतर जया तव्हळ १५०० पेक्षा जास्त भाशा लोक बोलत व्हतात. त्यावातल्या फक्त १५ च भाशासले सरकारनी परवानकगी दिधी. त्यानंतर काही लोकस्नी फारच लाई धरं म्हणून आखीन तिन भाशा त्यात जमा जयात. सरकार पैसासनी जी मदत करस ते अनुदान साळा कालेजसले देताना तवढ्याच भाशासले देवानं असे ठराये. इसेक सालमा या व बाकीन्या १३५० भाशा खतम व्हयी गयात. त्या बोलनारं २-५ च जण उरनात. १९७१ सालमझार सरकारनी कृपा ज्यासवर व्हती अशा भाशा सोड्यात ते ९० तरी भाशा जित्त्या व्हत्यात. आज त्यासना आकडा ७० वर इयेल से. आनखी इस पंचवीस वरीसमा त्याभी मरी जाथी. या समद्या मारी टाकेल भाशा दुसऱ्या तिसऱ्या कोन्या नहीत ते त्या आदिवासीसन्याच सेतीस.

भाशाच जर नसी ते ती भाशामझार सांगे ल गाना, कथा कशा ऱ्हाती ? त्यावात दडेल आपल्या संस्कृतीनी याद कशी ऱ्हाई ? बागे बागे आदिवासीनी जुना काळपसी चालत इयेल तोंडी इत्यासनी, इज्ञाननी परंपरा बरथड व्हत चालनी से. ती बरथडच व्हवा म्हणून सरकार व भारतमझारला इतर समाज आद्री परयत्न करी ऱ्हायनात. आदिवासीसन्या बोली माराना या कामले त्या 'प्रगती' म्हनतंस पण ही परगती का अधोगती सांगा बरं ?

मागला ७०-८० वर्षमझार भारतमा सगळीकडे कारखाना वनात. त्याना पाठोपाठ शेरीकरन जये. शेरात धूर आनी धूळ. कारखानास्मुळे शेरनी पानी व हवा दूसित जयी. सुरवातले शेरातला मानसस्ले कारखानानी वढ वाटे. तठे नवकऱ्या करानं भूषन वाटे. तठेच नवकऱ्या करनारा निपजवात असेच सिखाडानी पद्धत तयार कई. बिघडेल (दूसित) हवामुळे आजारी पडनारस्ले चांगलं कराकरता तसेच दवाखानानं ग्यान शिखाडानी येवस्था करेत. पण बागेबागे हे कमी व्हवाले लागं. आते परतेक शेरातून कारखाना हटाडानं काम सुरू से. शेरातला लोकसले कारखानास्ना फायदा नको से असे नही, त्यासले शुद्ध हवा व स्वच्छ पानी पायजेल से. त्यामुळे सगळा कारखाना आदिवासीसना टापूमा हलाडाना प्रयत्न व्हई ऱ्हायनात. काही कारखाना ते पूर्वेसपसी आदिवासीसना टापूमा खनिज काढासाठी सुरु करेल व्हतात. बिहार, मध्यप्रदेशना आदिवासी हमाल म्हनीसन तठे नौकरीले लाई धियेल व्हतात. त्यासन्या बायका तठे येश्यायेवसायमा गुताडी दिध्या व्हत्यात. आते ऱ्हायेल टापूमाभी त्याच चिन्हं दखातस.

म्हणजे जंगल, जमीन, भाशा गमाडी बसेल आदिवासी त्यानी हवा आणि पानीभी गमाडी बसई. त्या नवा कारखानास्मा अधिकारीस्ना जागावर परदेसातून इयेल किंवा तठे शिकेल भारतवालाले मिळतीन. चपरासीनी जागावर सेस आपला आदिवासी.

ज्यासले 'विमुक्त जनजाती' असे नाव दियेल से त्या आदिवासीसनी स्थिती फार भयान से. ज्यास्नी इंग्रजसले इरोध कयथा त्यासले इंग्रजसनी गुन्हेगार जमाती असे नाव दियेल से. १९५२ सालमा त्यासले 'इमुक्त' कये. त्यावात भामटा, टकारी, छारा, मध्यप्रदेशातला भिल, कंजार, वडरू अशा जवळजवळ २०० जमाती सेतीस. त्यासले आते खेतीनं ग्यान नही. शिक्षण व त्यावातून मिळनारा येवसायनं ग्यान नही. पोलिस त्यासले भयान तरास देतस. पोलिसच त्यासले चोऱ्या कराले, दारू गाळाले भाग पाडतस आनी वरथून त्यासवर खटला भरी वरल्या जागा पटकावतस. पोलिस कोठडीमा त्यासनावर व त्यासन्या बायकांसवर ज्या अत्याचार व्हतस त्याबद्दल बोलानीभी लाज वाटस.

पण या समदा प्रकारले जबाबदार कोण ? निव्वळ सरकारना पैसासवर ह्या प्रस्न सुटनार नहीत. ही परस्थिती बदलणार नही. आदिवासीसनी ६ कोटी आणि विमुक्तसनी ११ कोटी या १७ कोटी परजाले सरकार किती पैसा दी ? आगोदारच भारतनं सरकार खळम बनेल से. परदेशनं कर्ज काढी कसेबसे कारभार चालाडी ऱ्हायनं. यानाशिवाय जो

पैसा मिळस त्यावातला मोठा हिस्सा सरकारी अधिकारीसना खिसात जास. आदिवासीले साधी सायकलनं कर्ज हातात पाडासाठी ५० ते ६० टक्का लाच देनी पडस. तव्हळ सरकारकडथून पैसा घिसन आदिवासीनी प्रगति साधता येनार नही हे ते उघडं से.

तसेच परमुख समाज व आदिवासी यासनामझार जो झगडा निर्माण व्हयेल से, त्यात आदिवासीना बाजूले न्याय मिळनं शक्य नही. यानं कारण परमुख समाजकडेच सर्व मारानं, हिंसानं तत्वज्ञान से. इवान, आगीनगाड्या, कांप्युटरं खूप हिंसा करथीत अशा रसायन आणि अवषधं परमुख समाजकडेज सेतस.

आदिवासीकडे नही धड तत्वज्ञान, नही जमीन, नही जंगल, नही अधिकार, इतकंच कसाले, त्यासनी भाशा समजी घी असेभी नही. ही परिस्थिति बदलनी व्हई ते आदिवासीले इतर समाजना शस्त्रं व शास्त्रं समझाडी घेवानी गरज से. पण त्यानाबरोबर सोताना संस्कृतीमझारला निसर्ग व मानूस यानाबद्दलना जिव्हाळा जपाडी ठेवानीभी गरज से. आदिवासीनी सोतानी इचार करानी रीत से. तेच त्यानं खर हत्यार से. त्यासाठी भाशा हेच एक माध्यम से. भारतमझारला परतेक आदिवासी स्त्री पुरुषनी सोतानी भाशा जपाडी ठेवनं हाउ आपला नवा धरमच मानाले पाह्यजे ते कये नही ते आपला पूर्वज आपुले माफच करणार नहीत. एक काळ त्या जंगदलना राजा व्हतात. त्यासले आदिवाससनी आजनी पिढीनी परमुख धारना गुलाम व्हवाले आवडनार नही.

दैवयोगखाल भारतमझार आदिवासीससाठी नवा कायदा ई राह्यना. ह्या कायदाना परमुख मुद्दा या 'ढोल' ना अंकात छापेल सेत. तो कायदा समझी घेनं. त्याना हेतू सफल व्हवासाठी प्रयत्न करनं सर्वासनं कर्तव्य शे. इत्यासनी दियेल ही सेवटनी संधी से. तिना योग्य उपेग करानी गरज शे.

आपला पैकी ज्या शिकेल शेत त्यासले मनी प्रारथना शे. जंगल गये राज्य गये अवषध गयात प्राणी गयात आनी आपली भाशा, पानी, हावा संभाळा नही ते त्याभी जाती. आदिवासी संस्कृतीना अभिमान बाळगा नही ते ती फार दिवस टिकिनार नही. समाजना इतर घटकसनी नक्कल करामा वाया जाऊ नका. आपली अस्मिता राखा. ती राही ते अजून भी इत्यासले नवं वळण देनं शक्य व्हयी.

गुदस्ता नगीन राठवा व मनीषा वारीया यासनी तेजगडना गीतो हे पुस्तक बनाड. त्यानं प्रकाशन जये तव्हळ छोटाउदेपूर मनदारसंघना संसद सदस्य श्री. नारायणभाउ राठोटे, विधानसभा सदस्य श्री. सुखरामभाउ राठवा, मराठीमारला लेखक श्री लक्ष्मन गायकवाड व श्री लक्ष्मन माने हजर व्हतात. तेजगड ना दोनतीन हजार लोकभी व्हतात. त्यानंतर जव्हळ जव्हळ तेजगडले भेट देवाले विद्यार्थी व इतर लोक वनात तव्हळ त्यासले मनीषा व नगीन यासनी तेजगड ना गाना सिकाडात. ओरसंगना काठवर या गाना कैक सालपशी म्हनायी जायेल सेत. रानी काजलनीभी यातला कैक एकेल व्हती. रानी तेजलना राजमा यातला कितीतरी एकेल व्हती. रानी तेजलना राजमां सनसुदले याना नाद उमटेल व्हती. आते या पुस्तकमुळे त्या कायमना व्हयी गयात. ओरसंगनी थडीवर त्यासना नाद पुन्हाईन पुन्हाईन घुमणार से. एखादी पूनवना रातले आदिवासीसना टिमली नाचबरोबर यावातला गाना म्हणतीथ तव्हळ आपुला जंगलना राजा ज्यासले म्हणतस अशा पूर्वज आनंदखाल पानी कमीत कमी आपली भाशा आपला नाच, गाना टिकी सेत असे त्यासले वाटई त्यासना आनंद ओरसंगनी धारबरोबर चांदनामा वाहात राही. भाशा केंद्रनं हाही एक सपन से.



# आदिवासीससाठीसना नवा कायदा

**संकलित**

१९९६ ना कायदा नंबर ४० (Extension to the Scheduled Areas) हाऊ आदिवासीसन्या ग्रामपंचायतमजारला अधिकारबद्दलना शे. हाऊ कायदा लोकसभामा मंजुरी मिळनी तैनपशी दोन सालना कालावधीमजार वेगवेगळा राज्यसमा संमती मिळासाठी धाडेल शे. २४ डिसेंबर १९९८ ले हाऊ कायदा भारतदेशमा सगळा आदिवासी भागसले लागू व्हनार शे.

**१. कायदानं नाव :** पंचायतसाठीसन्या तरतुदी (पंचायतना अधिकार)

**२. व्याख्या :** ह्या कायदात वापरेल 'राखीव आदिवासी क्षेत्र' हायी संज्ञा राज्यघटनाना कलम २४४, पोटकलम १ ना अर्थसाठी वापरेल शे.

**३.** राज्यघटनान्या नवव्या भागमा ग्रामपंचायतबद्दल ज्या तरतूदी दियेल शेत, त्या सगळ्या ह्या नवा कायदानुसार राखीव आदिवासी भागसले लागू पडतीन. मात्र राज्य पातळीवरला विधीमंडळं राज्य घटनाना नवव्या भागमा तशा अधिकार दियेल शेत तरीभी ह्या कायदामा पुढे दियेल बाबतीत बदल करू शकनार नहीत.

अ. पंचायतबद्दल बनायेल राज्यपातळीवरला कायदा हाऊ परंपरागत रिवाज, सामाजिक आनि धार्मिक प्रथा तशेच सामूहिक साधनसंपत्तीना व्यवस्थापनना पारंपारिक पद्धतले धरी राही.

आ. गाव याना अर्थ, आपला पारंपारिक रिवाजले धरीसनच आपला कारभार सांभाळनारी एक समाजनी एक वस्ती नहिथे वसाहतना समूह नहिथे वस्ती आशा घितीन.

इ. प्रत्येक गावनी स्वतःनी ग्रामसभा राही, तिनामा गावनी मतदारयादीमा ज्यासना नावं राहतीन आशाच लोकसना भाग राही.

ई. प्रत्येक ग्रामसभाले आपल्या समाजन्या प्रथा-परंपरा, सांस्कृतिक अस्मिता, सामूहिक साधनसंपत्ती आनि न्यायनिवाडानी परंपरागत पद्धत सांभाळाना आनि जतन कराना अधिकार राही.

उ. सामाजिक आनि आर्थिक उन्नतीसाठीन्या कोनत्याभी योजना, कार्यक्रम आनि प्रकल्पसाठी, ग्रामपंचायतद्वारा तो हाती घेवानं आगोदर, ग्रामसभानी संमती घेनी पडयी. तशेच गरीबी निवारन नहिथे आनखी काही प्रकल्पससाठी लाभार्थीसनी निवड करानी जबाबदारी ग्रामसभानी राही.

ऊ. वरला कलम 'उ' मजार सांगेल योजना, कार्यक्रम नहिथे प्रकल्पससाठी ठरेल आर्थिक तरतुदीसन्या चांगल्या वापरसबद्दलना प्रमाणपत्र ग्रामपंचायतले ग्रामसभाकडून मिळावनं पडयी.

क. घटनान्या नवव्या भागानुसार राखीव आदिवासी भागसमजारल्या, राखीव जागा दियेल प्रत्येक पंचायतमजारन्या राखीव जागासनं प्रमाण हायी त्या पंचायत भागसमा इयेल वेगवेगळा समाजसना परस्पर प्रमाणना बरोबर राही.

: मात्र, अनुसूचित जमातसाठीसन्या राखीव जागा ह्या एकून जागासन्या निम्मापेक्षा कमी राहनार नहीत.

: तशेच, प्रत्येक पातळीवर पंचायतमुख्यनी जागा हायी मात्र अनुसूचित जमातसाठीच राखीव राही.

ख. पंचायतमा ज्यासनं प्रतिनिधीत्व व्हयेल नही, आशा अनुसूचित जमातीसमजारन्या व्यक्तीसले राज्य सरकार विभागीय नहिथे जिल्हा पातळीवर पंचायतमा नेमू शकस.

मात्र, आशा पद्धतखाल नेमेल सदस्यसनी संख्या पंचायतमा निवडी इयेल एकून सदस्यसंख्याना एकदंशांशपेक्षा जास्त राहनार नही.

ग. विकास प्रकल्पससाठी जमीन संपादित करानं आगोदर, तशेच आशा प्रकल्पग्रस्तसना पुनर्वसनना आगोदर योग्य ती पातळीवर ग्रामसभा नहिथे पंचायतबरोबर सल्लामसलत करनी पडयी. प्रकल्पनी राखीव आदिवासी भागनं प्रत्यक्ष नियोजन आनि सूत्रचालन मात्र राज्यपातळीवरतूनच व्हयी.

घ. राखीव आदिवासी भागनं सामान्य जलस्त्रोतनं नियोजन आनि व्यवस्थापन योग्य त्या पातळीवर पंचायतवर सोपी दितीन.

च. राखीव आदिवासी भागसमा सामान्य खनिजसाठी खानउद्योगले भाडेपत्र आनि परवाना देवानं आगोदर योग्य त्या पातळीवरली ग्रामसभा नहिथे पंचायतीसनी करेल सुचना विचारात घेनं आवश्यक शे.

छ. राखीव आदिवासी भागसमा सामान्य खनिजना उत्पन्नाना अधिकार लिलावद्वारा सोपाडासाठी सवलती देवानं आगोदर योग्य त्या पातळीवरली ग्रामसभा नहिथे पंचायतनी सुचना विचारात घेनं आवश्यक ठरयी.

ज. राखीव आदिवासी भागातल्या पंचायतीसना स्वशासनन्या संस्थाना दर्जा देवाना अधिकार आनि सत्ता देवानं येळे योग्य त्या पातळीवरल्या पंचायती आनि ग्रामसभा यासले खालला अधिकार मिळतीन यानी राज्य सरकार काळजी घी.

(१) नशाना पदार्थसनी विक्री नहिथे वापरना नियमन कराना, त्यावर बंदी घालाना अधिकार

(२) सामान्य वनस्पतीसवरला अधिकार /मालकी हक्क

(३) राखीव आदिवासी भागातली जमीननं हस्तांतरण रोखाना तशेच बेकायदेशीर पद्धतखाल जमिनना हस्तांतरणवर योग्य ती कारवाई करीसन ते हस्तांतरण रद्द कराना अधिकार.

(४) कोनताभी नाववर चालनारा गावना बाजारनं व्यवस्थापन कराना अधिकार

(५) राखीव आदिवासी भागातल्या सावकारी व्यवहारावर नियंत्रण राखाना अधिकार

(६) सामाजिक क्षेत्रसमा काम करणाऱ्या सगळ्या प्रकारन्या संस्थासवर आनि संस्थाचालकसवर नियंत्रन ठेवाना अधिकार.

(७) ट्रायबल सब-प्लान सहित स्थानिक पातळीवरल्या सगळ्या योजना आनि त्यासाठीनी साधनसंपत्ती यासनावर नियंत्रनना अधिकार.

झ. पंचायतीसले स्वशासनन्या संस्थासना दर्जा देऊ शकनारी राज्या पातळीवरला कायदातच अशा तरतुदी करेल राहतीन ज्यानंमुळे उचपातळीवरल्या पंचायती खालन्या पातळीन्या पंचायतीसनं नहिथे ग्रामपंचायतना अधिकार आनि सत्ता रद्दबादल करू शकनार नहीत.

ट. राखीव आदिवासी भागातल्या जिल्हा पंचायतन्या कार्यप्रणालीनं आयोजन करानं येळे राज्य पातळीवरला कायदामा घटनामा सहावा परिशिष्टमा व्यवस्था टिकवता यी.

**राखीव आदिवासी भागातल्या पंचायत कायदानं भवितव्य :**

वर दियेल कायदान्या तरतुदी आमलात येवानं आगोदर ह्या तरतुदीसवर, राज्यघटनाना नियमप्रमाणे भारतना राष्ट्रपतीकडतून शिक्कामोर्तब व्हनं आवश्यक शे. त्यानंतर भविष्यमा भारतनी लोकसभामा राखीव आदिवासी भागसबद्दल नवा कायदा घडेपर्यंत ह्या सगळ्या तरतुदी आमलात राहतीन. राष्ट्रपतीकडतून शिक्कामोर्तब व्हवान्या तारीखपावत

अस्तित्वात राहेल सर्व ग्रामपंचायतीसले हाऊ कायदा बंधनकारक राही. त्यानंतर जरी एखादा राज्यात राज्यसरकारनी पंचायतीसना भागसमा फेरफार कया, तरीसुद्धा त्या पंचायतीसना भागात हाऊ कायदा आमलात राही. याना अर्थ, २४ डिसेंबर १९९८ ले भारतातला सगळा राज्यसमा ज्या विभागं राखीव आदिवासी भाग म्हनीसन अस्तित्वात इतीन, त्या त्या भागात आदिवासीसन स्वशासन अबाधित राही. त्यानंतरभी घटनाना नवव्या परिशिष्टात, लोकसभामा पूर्ण बहुमतवरी बदल कराशिवाय हाऊ स्वशासनना अधिकार कोनतंभी राज्यसरकार, इतकंच काय, पन केंद्र सरकारभी हिरायी घेऊ शकनार नही.



# गटलूना लगनले गयथू.....

राजेंद्र सूर्यवंशी

गटलून लगन जमनं हायी ऐकीसन मनात भलतांच आनंद जया. आपलाच दोस्त गटलूना आवढातच दोन हातना चार हात व्हई चालनात. गटलून्या पत्रिका खपायन्यात, एक दिवस तो भेटना म्हणे 'राजू फिक्स जय गडा भो. लगनलें इशी ना ?'

मंग गटलूना लगानना सूर्य उगवना. माले त्याना लगननी सुद बी नव्हती. सहज फिराले गयथू पानटपरीकडे तठे गटलू मंडोळ्या बांधीसन तयार ! त्यानी गावातलंच टॅक्टर ठरायल व्हतं पण गरीबनंच लगन ते. तो टॅक्टरवाला कांदा भरीन इकाले जायेल व्हता. निलाव जया नही म्हणून टॅक्टर तठेच व्हतं. पहाय वाट पाहाय वाट कुठे टॅक्टर येस. शेवट गटलू कटाळना. मनी सायकल घीदी अन मार्किटमा गया. टॅक्टर वालाले भेटना. तो म्हणे भो, टॅक्टरले रातपशी खुटी बशेल शे. थोडा वेळात निलाव झाल्यावर जावूत.

गटलू तिकूनच टॅक्टरवर वशी वना. टॅक्टर फिरायं. वऱ्हाडी मंडळी, बॅन्डपार्टी, नवरदेव टेंक्टरवर बसनात. टॅक्टर धक्का स्टेंट व्हतं म्हणीसन दोनचार टिक्रूरबन गडी धक्का माराले तयारच व्हतात. तवशी मी पानटपरीपन गटलूले दखायनू तो लगेच खाल उतरना म्हने, काय यार, सूर्यवंशी तूनी ते तयारी बी दखात नही आम्ही तुनीच वाट पाही राह्यनूत मी जावाले दराशी कानकूच करू. गटलू म्हणे यार तू मना घोटाळा कया. मी तूना भरोसावरच व्हतू आते तिठे आहेर-आंदण कोण टिपही. माले भलतंच वाईट वाटनं. म्हणत श्रीमंतनं लगन ऱ्हातं ते विगर पत्रिकाना जातू आनि आपला दोस्त रावण्या करस म्हणतं गटलू मी आता घरतून येस. घर वणू लुंगी बदली पँट चढाई पाच रूपया खिसात टाकात अन गवू. टॅक्टर धक्का मारीसन तयारी मानच व्हतं बसनू. बरा बापू भेटी गया. म्हणतं, बापू तू भी यी राहयना ?

टॅक्टर ढळनं डायव्हर अनुभवीच व्हता, दोधा पाटील. आदिवासी मंडळीले टार्लीमान बसापेक्षा पूढला डोकावर बसानी जास्त हौस बराच गडी डोकावर बसनात बॅन्ड पार्टीवाला मोजीसन सहा गडी व्हतात त्यासनी सुपारीबी मोजकीच. चला बरा आपलाच समाजनं लगन शे घेवूत नाची कूदी काढी त्यासनापन मोठा सजाडेल ढोल व्हता. गटलूना म्हातारानं एक सायकल टारलीमान टाकी धीदी खालपपन रस्ता खराब टॅक्टर धडऽऽऽ घड ऽऽऽ करें. मांगे मोठा ढोल, त्यानामांगे गटलूना म्हातारा गुडघासवर बसेल सगळी मंडळीले ऊन मुळे घाम वना थोडा वेळात सायकल हिंदळी-हिंदळी पुढे सरकनी तिन्हा पांडेल म्हाताराले टोचाये. थोडा वेळ कळ मारी पण नवरदेवनाच बाप तो त्याले वाटन आपू कसाले तरास घेवा तो थोडा बाजूले सरकना कोणच ध्यान सायकलकडे नही. तिना पांडेलनी मोठा ढोलनं काम करी दिधं बॅन्ड पार्टीमधला मास्तरनं ध्यान गयं त्याना नूर तठेच उतरी गया टॅक्टर उभ कय. वाईट वाटे गटलू उतरना त्यानी बॅन्डवालासनी समजूत घाली. त्यासले सुपारी भलतीच महागपडी. तुम्ही म्हणशात, सायकल कसाले घीदी ? तर अंटार्टिका जहाजवर जसे हैलीकॅप्टर, पुढे समुद्रात बर्फ शे का ? ते पाव्हाकरता ऱ्हासना तसेच रस्ता कशा शे ते पाव्हाकरता सायकल घिदी व्हती.

खाटकी लेंडी जवळ दोन सायकलवाला जाई ऱ्हायना व्हतात. माले अन बापूले पाहीसन त्यासना मधला एक गडी म्हणे, आयले आदिवासी काय सुजरी गयात ! आम्ही हासी हासी वातडाच व्हयी गऊत टॅक्टरना डोकावर कळबन

मंडळी बसेलमुळे लोहोणेरजवळ त्यासनं मटगार्ड वाकाडी दिधं दोधा भू नाराज व्हयी गया म्हणे आते येल्डींग करनी पडही. काय संध्याकाळनंत लगीन शे. वेल्डींगवालासनी वेल्डींग मारी पण टॅक्टरनी बॅटरीक उतरेल सातआठ गडी उतरनात टॅक्टर लोटाले दोधा पाटीलले वाटणं लोडन टॅक्टर लोटाले जरासा जीव खाई पण थोडाच वेळात दोधा भूना हातपायच गळी गयात टॅक्टरनापुढे न्हाईना दुकाननापुढे फळीना बाकडावर एक म्हतारा अन त्यान्या दोन्ही नाता बसेल व्हत्यात टॅक्टरना जोर पाहिसन नाता हायी गल्लीना ती गल्ली व्हयी गयात. जशी बाकडाले ठोस मारी तशा म्हातांरा उताना तडक पडी गया अन वर पाहीसन लाताझटके पुढे चालीसन टॅक्टरना बिरेक लागनात मंग कशाबशा म्हातारा उठाडा थंड पाणी पाजं. न्हाईन्या गाळ्या ऐक्यात पैसा भरी दिधात आराई मार्गले लागूत. त्या मार्गले मोठल्या मोठल्या खिंडा ! मझार कलेरीसना गजर. सगळा वऱ्हाडना आंग वर फोफाटानी पावडर लागी गयी.

प्रवास संपना. तठे आल्यावर समजन की एकाच मांडोखाल दोन टाळ्या शेतीस आमलें जावाले साडेचार वाजी गयात त्यामुळे दुसरा नवरदेव गटलुवर डोळा ताणे नंतर गटलू पारवर बसाडा कलोरीसनं संगीत सुरू कयं. बापूले म्हंत, बापू मी भलता कटाळी गवू तुनी गावात वळकपाळक शे का ? बापूनी थोडायेळ विचार कया म्हणे, राजू मन्हामिळता नागपुरले डी. एड. ले आठली एक पोर व्हती, थोडीशी तोंडवळक शे. म्हंत तिन्ह नाव सांग गंजविचार कया बापूले फक्त आडनाव आठवणं. बापूले डी. एड. व्हयीसन दीडे वर्ष व्हयेल. बापू वळक काढाले नही म्हणे. म्हंतं वळक भिडावानं मना आंगे लागं एक गडीले इचारं तो म्हणे पुढे ती पोरना भाऊ गवंडीना हातखाल काम करी ऱ्हायना जरासा जीवात जीव वना त्याले कशीबशी वळक मारी त्यानी चिखुलना आळात हातं धुयात. गवूत त्यांना घर पन पोरनं लगीन व्हयी जायेल व्हतं आते काय वळक देवा ? तरी इकड-तिकडना विषय मी तिना बाप पण मारात त्यासले वाटनं पाहूणासले चांगली माणुसकी दखास. म्हणे नंदया चहा ठी दें.

नंदयानी चहा आणा चहा पेता पेता पोरना बानी इचारं भाउ इकडे कथा वंथात ? बापू म्हणे. लगनले इकडे ते आपला समाजनं लगन नही शे. तुम्ही कुठे लगनले वंथात ? बापू म्हणे ते मळातआंदा नाईकना आठे लगन से ना तठला नवरदेव नौकरीले शे तो आमना दोस्तचशे त्यानी आग्रह कया म्हणून वंथूत. तठली माय म्हणे, भाऊ आता वनात ते दोन दोन घास न्याहऱ्या करी घ्या विचार कया हया घर वळक मामुलीकच शे यासले तरास देवामा काही मतलब नही बापू म्हणे, नही माय, आते आमले जेवण तठेच करनं पडतीन. नहीते नवरदेव रागे भरही.

गावातून ढळनूत टाळीना आवाज येवाले लागा बापू म्हने, 'राजु टाळी सापडाले पाहयजे. पळ ! पोटात भुक राहयेना बापू टाळी सापडावा करता धावाले लागा. मंग माले बी धावणच वनं टाळी लागल्यावर गटलू भेटना म्हणे, सूर्यवंशी. माईकपण बैस कागद पेन आनेल शे ना ? मंग आहेर टीप मी आहेर टीपाले बसनू पहीला आहेर दोधा पाटीलना पाच रूपया, दूसरा बापूना, तिसरा मन्हा अन एक पाव्हनाना पाच रूपया आणी दोन स्टीलना गल्लास वनात एवढं एक दाव माईकवर गाजाडं आणखी बसनू. पाहाय वाट-पहाय वाट काही आहेर इयेत ना. त्या आहेरसनी रक्कम ईस रूप्या अन दोन गल्लास गटलूनी मायना हवाले कयात. मी मना कर्तव्यातून मोकळा जवू.

तवपावत पहिली पंगत उठी गयी. दुसरी पंगतले बसवा आशे बापूनी माले खूनकाडं पण तीमंडळीले नाचानी भलती गोडी. गंज सांगी पाहये ऐकेतच ना. मंग मी, बापु पंगतमान हात धुई बसनूत मंग काही मंडळी बसनी जेवाले सुरूवात जई थोडाच वेळात गटलू जोडा-जुगुम सहीत वना. शिरावालाले आमले शिरा वाढाले आग्रह करे. नंतर खिसानं बटण उघाडं दोन-दोन रूप्या मना नी बापूना पात्रसले लायात त्या चार रूपया पाहिसन आम्हले आनंद जया आनंद आशा की, इकून एस. टी. वर जातायी. कारन तिकडून येतांना आमना कानं किटी गयथात, भाडाले जास्त पैसाभो आम्हनापण नव्हता. त्या आनंदातच मी व्हतू तवशी घुघरीवाला वना त्यानी कोयडा भातमान दरास रस्सं टाकं मी म्हणतं काहो घुघरी शे का ? त्याले आनंद जया आम्ही मान पाननाच पाव्हणा ! म्हणे 'तुम्ह याही भाऊचं सतसं तुमतं नही म कोनाले' ! त्यानी प्लॅस्टीकना गल्लास बादलीना तळले हात बुडाया तवशी मन्ह इकडे पोटच भरी वनं. म्हंत, थोडीच द्या त्यान गल्लास भरीन टाकीच दिधी मांगे फिरी पाहस ते चार-पाच नवरीकडला गडी आम्हना मांगे उभा.

त्या म्हणेत, 'याही भाऊ तवढं' खाईच घ्या. कशे तरी पोट चोळी आम्ही ते मारी दिधं मंग हात धुईसन म्हणतं हाई गोरज मूहूर्त आपुले काही परोडणार नही आपुले झोपाले ती मायनी बलायेल शेना.

गटलूना निरोप घिदा. मी, बापू रातना धा वाजता मळातून गावात गवूत. घर सोयनं ध्यानात नको. कशातरी गवूत पण तिठली सगळी मंडळी झोपेल कोणच ध्यान नहीं. थोडीच वळक आता कोनले उठाडवा वसरींमान एकच बलप, थोडा वेळात कशी काय जाग वनी मायले ? रामलेच माहीत म्हणे ''ओ बय, पाव्हणा कव्हळीसना उभा सेत वाटस.'' हाही वाक्ये मायनी वसरीमधला झोपेल मंडळीनी ऐकं मंडळीले वाटणं की कितलामोठा पाव्हना व्हतीन मायना ! सगळासन्या गोधडया उचकायन्यात, आम्हना तोंड पाहयात अन सगळा गोधडीसमान गुडूप. मायना मोठा पोऱ्या पट्टयासना पलंगवर झोपेल व्हता. मायनी त्यानी गोधडी हिसकी नान्या घरात झोप, पाव्हनासले आठे झोपुदे.एक रग दिधा मी बापू झोपनूत पण झोप कुठे येस. पारकी जागा. कपडा तशाच आंगवर. पलटी मारी का पट्टीसना पलंग इतला वाजे की वसऱ्यातला सगळासले जागे करी दिये आयले, काय करवा ? तशाच कळ मारी ऱ्हायनू.

सकाळीस उठीसन तोंड धुयात चहा पिधा तवशीन गाडीना आवाज वना गाडीवर बगनूत गटलूना मान-पानना दोन-दोन रूप्याना टिकिट फाडात सटणापावत वनूत तठुंग लोहनेर अन लोहणेरतून पाय-पाय खालप.

('बांधिलकी', देवळा महाविद्यालय, यासना सौजन्यखाल)

# भाशानं संशोधन आनी प्रकाशन केंद्र

६, युनायटेड अॅव्हेन्यू, दिनेश मिलजवळ, बडोदा ३९०००७; फोन (०२६५) ३५१४८७/३३१९६८ फॅक्स : (०२६५)३३११३०

स्थापनानी तारीख : १२ एप्रिल १९९६

इंडियन सोसायटीसनं रजिस्ट्रेशन कायदा १८६०० रजिस्ट्रेशन नं आनि रजिस्ट्रेशन साल : ई /४९६९

वडोदरा तारीख १२-४-१९९६

आदिवासीसन्या कला, साहित्य आनी संस्कृती यासले पुढे घीजावासाठी व त्यासनं जतन करासाठी भाशा केंद्र अडकेल से. संबंध देसभरना मदत करनारा इद्वान आनि समाजकार्यकर्ता यासनं केंद्रनी जाळंच इनेल से. केंद्र काही पुस्तकं छापंस तसेच 'ढोल' नावनं येगयेगळ्या आदिवासी भाशा व बोलीभाशासमा एक मासिकभी छापस. या केंद्रनी तेजगडले येक लायब्री काढेल से तसेच बडोदा शेरमा आदिवासीसमा बांधकामनं कामं करनारसना कामगारसना पोऱ्याससाठी एक साळाभी काढेल से. तेजगडमा २० येकर जागाना तुकडामा आदिवासी जातना लोकसमजारला कलासले वाव देवासाठी एक केंद्र वाढाई राह्यनं. हाई केंद्र तेजगडना रहिवासी व आजूबाजूना खेडातला लोकस्नी मदतखाल काम करी ऱ्हायनं.

केंद्रना कामं :

१. आदिवासीसनी भाशा व त्यासनी संस्कृती यासना अभ्यास करनारा भारतीय इद्वानसनी एक यादी करनं : जिवात ७०० नावं ऱ्हाती.

२. भारतमजारल्या आदिवासी भाशा आनि आदिवासी जाती यासनी यादी करनी.

३. राठवा, पावरा, देहवाली, कुकना डांगी वगैरे भाशासमा आदिवासी तोंडी मासिक 'ढोल' छापानं से.

४. बडोदा शेरमा बांधकाम करनारा ज्या कामगार सेत त्यासना पोऱ्याससाठी एक साळा काढनी से. १९९७-९८ ना काळात दोन साळासनी तयारी से.

५. तेजगडना जवान आदिवासी वाचकससाठी एक ग्रामीण लायब्री काढानी से.

६. वेरियर एल्विन यानी यादमा भाशनंसनी एक माळ : १९९७ मां के.जी. सुब्रमण्यन, १९९८ मा महाश्वेता देवी यासना भासनं जयात, त्या छापेलभी सेत.

७. आदिवासी जातीजमातीसवर पुस्तकं छापना : १. तेजगडना गीतो २. पावरा समाज व संस्कृती

८. साहित्य अकादेमीना एक कार्यक्रम से : आदिवासीसन साहित्य व तोंडी परंपरा यासना ८० पुस्तकं छापना सेत. डायरेक्टर : डॉक्टर जी.एन.देवी. या कामना हापिसना पत्ता : ६२, श्रीनाथ धाम सोसायटी, दिनेश मिलजवळ, बडोदा.

९. भारतना आदिवासी इतिहास, कला आणि संस्कृती सभा-१९९७. सेक्रेटरी : डॉक्टर अजय दांडेकर, पहिलं राष्ट्रीय इथाका संमेलन आक्टोबर १९९७ मा छोटाउदेपूरले जयथं.

१०. ज्यासनी उपेक्षा वही ऱ्हायनी अशा भटक्या जातीसना हक्कससाठी कृतिगट १९९८. अध्यक्ष : महाश्वेता देवी, सेक्रेटरी : जी.एन.देवी - ज्यासकडे कोनस लक्ष नही अस्या उपेक्षितसना उध्दारसाठी मोहीम राबाडी ऱ्हायनात.

११. राष्ट्रना स्तरवर येगयेगळ्या इंद्यापिठ , साहित्य अकादमी, मुझियम आफ मॅन, भोपाळ या संस्थांसनी मदतखाल नऊ सेमिनार घिदात. ४ वर्कशाप, ५ सेमिनार यासले भारतना काना कोपरामजारला इद्वान आणि कार्यकर्ता व्हतात.

१२. गुजराथ व महाराष्ट्रना आदिवासीसना स्थलांतरना सर्वे : सध्या चालू.

आदिवासी बोलीमध्ये **ढोल** हे नियतकालिक भाषा केंद्राद्वारे प्रकाशित केले जाते. अहिराणी, देहवाली, पावरी भिली, राठवी भिली, कुकणा डांगी, डुंगरी भिली, पंचमहाली भिली आणि भांतु अशा एकूण आठ बोलींमध्ये **ढोल** प्रसिद्ध करण्यात येते; आणि त्याचा व्याप अजून वाढविण्याचा आमचा विचार आहे. **ढोल**च्या ह्या आवृत्तीचे संपादक **श्री. सुधीर देवरे** हे लोकजीवन व लोकवाङ्मय याचे अभ्यासक असून कलामीमांसा या विषयावर संशोधन करीत आहेत.



प्रकाशक

**भाषा संशोधन प्रकाशन केंद्र**

मुद्रक

**महाराजा सयाजीराव विश्वविद्यालय मुद्रणालय**

**ISSN : 0971 9156... 97**